# दोन शब्द

भूदान यज्ञाचे पुष्कळ साहित्य निर्माण झालें आहे. पण खेड्यांतील लोकांस समजेल अशा सोप्या व छोट्या पुस्तकाची आवश्यकता तीव्रतेने जाणवूं लागली. म्हणून मराठी चौथी पांचवी शिकलेल्या लोकांकरितां हें पुस्तक लिहिलें आहे, यांत विद्वत्ता नाही. सूत्रमय भाषा नाहीं. पुनरुक्ति दोषही कोठें कोठें आढळेल. १० शब्दांहून मोठें वाक्य सहसा ह्यांत आढळणार नाही. संयुक्ताक्षराचे शब्द वगळले आहेत, समास टाळले आहेत, दुर्बोध व क्लिष्ट वाक्यरचनेस फांटा दिला आहे. मिश्र व संयुक्त वाक्येंहि अपवादानेंच आढळतील. अलंकार त्याज्य मानले आहेत. मुद्दाम जाड ठसा वापरला आहे.

तसेंच भूदानावर काय बोलावें असेंहि कार्यकर्ते विचारीत होते. प्रत्येक कार्यकर्त्यानें सार्वजनिक भाषण देतांना कोणते कोणते मुद्दे आणावेत हीं सुद्धां हें पुस्तक लिहितांना दृष्टि होती. माझ्या मतें त्यांच्या प्रश्नाचें हें पुस्तक उत्तर आहे.

हें पुस्तक प्रकाशित करण्यास प्रा. बलराम वनमाली व श्री वसंतराव बोंबटकर यांनी मदत केली त्याबद्दल मी त्यांचा आभारी आहे.

असें हें छोटेखानी पुस्तक सर्वांस आवडो. आजची अलौकिक क्रांति समजण्यास व समजावण्यास याने मदत होवो.

वर्धा,
१९-११-५४

टा. कि. धंग

# (१) स्वराज्य मिळालें, पुढें काय ?

आपला हिंदुस्थान अत्यंत पवित्र देश आहे. भारतांत जन्मास येणें पूर्वपुण्याईनेच घडतें असेंहि शास्त्रांत म्हटलें आहे. आपला देश ऋषीमुनींची, साधुसंतांची खाण आहे. परंतु आपल्या या देशांत आजकाल आपण धर्मभावना विसरलों. जातिभेदाने व धर्मभेदाने आमच्या देशाचे तुकडे तुकडे झाले. म्हणून या देशावर २०० वर्षांपूर्वी इंग्रजांचें राज्य आलें. इंग्रजांनी आमच्या देशाच्या अवनतींत आणखी भर टाकली. खेड्यांतील उद्योगधंदे ठार केले. मजूर-मालकांत, गरीब-श्रीमंतांत आधींच असलेला फरक आणखी वाढला. पूर्वी जमीन कोणीहि सावकार कर्जांत घेऊं शकत नसे. आतां इंग्रजी कायद्याने तेंहि शक्य झालें. म्हणून पुष्कळ जमीन थोड्याशा लोकांच्या हातांत गेली. गांधीजींना हें सर्व दिसत होतें. म्हणून त्यांनी इंग्रजी राज्य येथून हटविण्याकरितां शांतीच्या मार्गाने लढाई केली. देश १९४७ मध्यें स्वतंत्र झाला. या देशाचे प्रश्न सोडवित असतांना एका माथेफिरूने गांधीजीस गोळी मारली. गांधीजी देवाघरीं गेले. सारा देश

हळहळत. देशास स्वराज्य मिळालें. नव्या दिल्लींत, नागपुरांत व मोठमोठ्या शहरांत १५ ऑगस्टला उत्सव होऊं लागला. पण गोरगरीबांत उत्साह नव्हता. कारण स्वराज्याने गरीबांची गरीबी दूर झाली नाही. देशांत भयंकर गरीबी व प्रचंड श्रीमंती शेजारीं शेजारीं राहात होत्या. प्रत्येक खेडयांत व हरेक शहरांत हा देखावा दिसत होता. गोरखपुरमध्यें तर शेणातले गव्हाचे दाणे वेचण्याचा अधिकार लिलावांत ठरत असे. जो जास्त बोली बोले त्यास शेणांतून दाणे टिपण्याचा हक्क. गाईस व म्हशीस आपण दररोज खाऊं घालतो. ती आटली तरीहि तिला उपाशी ठेवित नाही. पण माणसाच्या घरांतली चूल दररोज पेटली आहे कीं नाही याकडे कोण पाहणार ! त्याच्या पोटातली चूल तर दररोज पेटते. गरीब देशांत फुकट खाऊं घालणें सरकारला किंवा समाजाला शक्य नसते, तें बरेंहि नाही. एका धट्टयाकट्ट्या माणसाने काम केल्याशिवाय फुकट खाण्याची नियत कां ठेवावी ? पण त्यास काम कोण देणार ? देशांतील विचारवंतांनी देशसुधारणेची पांच वर्षांची एक योजना बनविली. त्यांतहि सर्वांना काम देण्याची गॅरंटी नव्हती.

# २ देशाची आजची स्थिति

आणि इकडे देशाचें शील खालीं खालीं जात आहे. इमानदारीने काम करण्याची कोणाचीहि इच्छा नाही. शिकलेल्यांनी व उच्च मानल्या गेलेल्या लोकांनी पूर्वीच काम करणें खालचें मानलेलें. श्रीमंतांनीहि आता कामापासून पाठ फिरविली. राहता राहिला समाजरुपी पाठीचा कणा 'मजूर'. त्यानेहि पोटाचें पाणी न हलेल अशा बेताबाताने काम करण्यास सुरुवात केली. शेती त्याची नव्हती, गुरें ढोरें त्याचीं नव्हतीं. समाजांत श्रेष्ठ मानला जाणारा कोणीच काम करीत नव्हता. मग त्याला तरी इमानदारीने काम करण्याची प्रेरणा कोठून मिळावी ?

## अधर्म वाढला

हा अधर्म इतरहि क्षेत्रांत फैलावला होता. पंचवीस-तीस वर्षापूर्वी खेड्यांत दूधहि कोणी विकत नसे. आता शुद्ध दूध व तूप कितीहि पैसे दिले तरी विकत मिळत नाही. इतर गोमांस खाणाऱ्या देशांत दूधांत पाण्याचा थेंबही कोणी मिसळत नाही. पण गायीची पूजा करणाऱ्या भारतांत आपण काय पाहतों ? कधीं कधीं पाण्यांत दूध टाकलें कीं दूधांत पाणी याचें कोडें पडायचें ! सोनार, चांभार, शेतकरी, व्यापारी

सर्वच आपआपल्या गाळात भेसळ करू लागले. रेल्वेत प्रवास करतांना मुलामुलींचे वय कमी व्हावयाचें, कंट्रोलच्या दूकानांतून माल आणतांना वाढावयाचें. हाय पैसा, हाय पैसा म्हणून चोहींकडे हाकाटी सुरु झाली. 'कसेंहि करून पैसा मिळवा' हाच सर्वांचा मंत्र झाला. व्यक्तिगत स्वार्थाचा प्रचंड वारा चोहींकडे वाहूं लागलेला. अशा स्थितींत धर्मास, खरेपणास, इमानदारीस कोण विचारतो ?

## स्वराज्यांत विरोधाभास निर्माण झाला

इकडे अशा रीतीने धर्मभावना ढिली झाली. उद्योग नष्ट पावले. 'खेड्यांतील शेतीसारखा एकमेव उद्योग बराचसा जमीनदारांच्या, सावकारांच्या ताब्यांत गेला. दुसरीकडे स्वराज्यांत प्रत्येकास एक मत देण्याचा अधिकार मिळाला. गरीबासहि राज्यकारभाराचा तेवढाच अधिकार जेवढा श्रीमंतास. शिकलेल्यास जेवढा अधिकार तेवढाच बिनशिकलेल्यास. संस्थानें व राजेरजवाडे नष्ट झाले. जमीनदारी व जहागिरदारी खतम झाली. मग जमीन् व संपत्ति वांटणीचें पुढचें पाऊल केव्हां उचलणार ? गरीबांस आशा निर्माण झाली. ध्येयानिष्ठास स्वप्नें पडूं लागलीं. जगातहि श्रीमंती गरीबी होती. रशियांत क्रांति झाली. गरीबांच्या नांवाने हुकुमशाही स्थापन झाली.

श्रीमंतांची कत्तल झाली. या देशांतून हा समतेचा विचार भारतांत सारखा येत होता. पश्चिमेकडून केवळ मोटारी, विमानें, औषधी आदि वस्तु भारतांत येत होत्या असें नाही. हा समतेचा विचारहि त्यांच्याच बरोबर येत होता. इतक्यांत स्वराज्यानंतर आपला शेजारी चीन तेथेंहि तेंच घडलें. गरीबांच्या नांवाने राज्य सुरुं झालें. श्रीमंतांची कत्तल झाली.

## ३. हैद्राबादेंतील कत्तल

हिंदुस्थानांत दक्षिणेला हैद्राबाद नांवाचा प्रांत आहे. त्यांत तेलगु भाषा बोलणारे कांही जिल्हे आहेत. त्यास तेलंगणा म्हणतात. तेथील नालगोंडा व वरंगळ या दोन जिल्ह्यांत प्रजा गरीबीमुळे बेजार झाली होती. दिवसा काम नाहीं, स्वतःची शेती नाही व दुसरा धंदा नाही. ताडी पिऊन लोक दुःख विसरण्याचा प्रयत्न करायचे. त्यांना लालभाईंनी (कम्युनिस्टांनी) संघटित केले. तेथील गरीब एक झाले. जमीनदारांची रात्रीं कत्तल करून जमीन ताब्यांत घेण्यास गरीबांनी सुरुवात केली. कोणतेंहि सरकार हा दंगा धोपा कसा चालूं देणार? सरकारने पोलिस पाठविले, मिलिटरी पाठविली. त्यांनी हजारों लोकांना केदेंत टाकलें,

शकतें हें दाखविणारा कोणीतरी पाहिजे होता. लोकांस तहान लागली होती. पावसाळ्यांतील नदीनाल्यांचें ते गढूळ पाणी पिऊं लागले होते. त्यांना शुद्ध पाणी दाखविणें जरूर होतें. अशा रीतीने परिस्थितीमध्येंच शुद्ध पाणी दाखविणाऱ्याची–**साम्ययोग्याची**–आवश्यकता निर्माण झाली.

## ४. कोण हा विनोबा ?

मग ही जगाची आशा कोण पूर्ण करणार ! दाट अंधकारांत कोण दिवा दाखविणार ? गांधीजीनंतर कोण त्यांचा शिष्य पुढे येऊन हा भार उचलणार ? गांधीजींनी १२ वर्षांपूर्वी प्रथम सत्याग्रही नेमलेले विनोबाजी पुढे झाले. विनोबाजी बालब्रह्मचारी आहेत. कॉलेजचें शिक्षण बेकाम समजून त्यांनी सोडून दिलें होतें. मागील ३० वर्षे वर्ध्याजवळ ईश्वरभक्ति करीत होते. दीनदुबळ्यांची सेवा हें भक्तीचें उत्तम साधन असे ते मानतात. म्हणून मागील ३० वर्षांपासून गरीबांची खेडुतांची सेवा ते करीत होते. शेतींतून फावल्या वेळांत खेडुतांना कांहीं उद्योग पाहिजे. म्हणून त्यांनी चरखा–तकली सुधारणेंत लक्ष घातलें. गांवांतील लोकांना उत्तम शिक्षण स्वस्तांत मिळालें पाहिजे. म्हणून त्यांनी बुनियादी पद्धतीचे प्रयोग केले. आपल्या

समाजांत भंगी सर्वांत हीन मानला जातो. म्हणून त्याची स्थिति सुधारण्याकरितां स्वतः दररोज कित्येक वर्षे भंगीकाम केलें. सर्वांस गीतेसारखा सर्वोत्तम ग्रंथ मातृभाषेंतून कळावा म्हणून गीतेचें समश्लोकी भाषांतर केलें. 'गीताई' म्हणून तें सर्वत्र प्रसिद्ध झालें. अशा रीतीनें हर प्रकारांनी ते भारताशीं एकरूप होत होते. पैसा किंवा कीर्ति यास तर ते साधनेंत विघ्न समजून यांपासून दूर पळणारे. त्यांनी पैशापासून मुक्त राहण्याकरितां पवनारला 'कांचनमुक्तीचा' प्रयोग सुरु केला. गांधीजींनंतर ते एक वर्षभर सारा भारत हिंडले. त्यांत त्यांना अनेक मानपत्रें मिळालीं. एका रात्रीं सर्व झोपले असतांना विनोबाजींनी तीं मानपत्रें गोदावरी नदीस अर्पण केलीं. अशा साधुसंतांची एकच महत्वाकांक्षा असते. या ना त्या दुःखामुळे सर्व लोक रडत असलेले त्यांना दिसतात. यांपैकीं कांहीं दुःखें माणसानेंच माणसावर लादलेलीं असतात. हीं दुःखें तरी कमी करावी हाच साधुसंतांचा प्रयत्न असतो. बुद्धानें म्हातान्यास, रोग्यास व प्रेतास पाहिलें. तो राजवाडा सोडून वनांत दुःखाचें कारण शोधण्यास गेला. विनोबाजीला हैद्राबादचीं दुःखें माहित होतीं. भारतमाता स्वराज्यांत आपल्याच मुलांच्या रक्तानें

कलंकित झाली होती. म्हणून विनोबाजी आपला आश्रम सोडून बाहेर पडले.

## विनोबा निघे पायीं पायीं

झालें! विनोबाजी पायीं पायीं निघाले. विमानाच्या काळांत पायीं हिंडण्याची रीत जगावेगळी होती. पण पुढे लोकविलक्षण यज्ञच देवास सुरु करावयाचा होता. त्याचीं ही अपूर्व तयारी चालली होती. हैद्राबादजवळ शिवरामपल्ली येथें सर्वोदय संमेलन झालें. संमेलनाच्या शेवटीं विनोबाजींनी तेलंगणांत पोलिसाशिवाय व फौजेशिवाय एकटें जाण्याची घोषणा केली. सर्वप्रथम ते कम्युनिस्टांस तुरुंगांत भेटले. त्यांचीं दुःखें जाणलीं. सरकारला व कम्युनिस्टांना—दोघांनाही—योग्य सल्ला दिला. नंतर ते तडक दंडकारण्यांत—नलगोंडा व वरंगळ जिल्ह्यांत—जाण्यास निघाले.

## पोचमपल्लीचा तो पावन दिन

१८ एप्रिल १९५१ चा तो दिवस. विनोबाजींचा मुक्काम पोचमपल्ली या खेडें गांवीं होता. इतर खेड्यांसारखींच येथली स्थिति. सकाळीं ग्रामफेरी झाली. दुपारीं सूतकताईनंतर सभा सुरु झाली. तेथील हरिजनांनी सांगितलें, "आम्हांस कामधंदा नाही. जमीन तर नाहीच.

अशा स्थितींत आम्ही पोट कसें भरावें " ? सवाल रोकडा होता. उत्तरहि रोकडें हवें होतें. कोरड्या गोष्टी काय कामाच्या ! विनोबाजींनी सरकारकडून जमीन देवविण्या-बाबत विचार सुरु केला. हरिजनांना विचारले असतांना त्यांनी ४० एकर कोरडी व ४० एकर बागाईत जमीनीची मागणी केली. पण सरकारकडून उत्तर केव्हां येणार ? सरकारी यंत्र मुंगीच्या गतीने चालते हा नित्याचाच अनुभव आहे. वेळ संपत आली म्हणजे तक्रारी मिळावी हा आपला नेहमीचाच अनुभव. यांना तर आतांच तहान लागलेली. विहीर खोदल्यानंतर मिळणाऱ्या पाण्याने आत्ताच्या तहान-लेल्यास आश्वासन देणें हा क्रूर विनोद झाला असता. विनोबाजींला सहजच गांवकऱ्यांना विचारण्याची इच्छा झाली, "सरकारकडून उशीर लागला तर गांवकरी कांहीं जमीन देऊं शकतील की नाहीं " ? ईश्वर अर्धवट काम करीत नसतो. ईश्वर एकीकडे मुलास भूक देतो, दुसरीकडे आईच्या स्तनात दूधहि देतो. इकडे विनोबास ईश्वराने मागण्याची प्रेरणा दिली. दुसरीकडे रामचंद्र रेड्डी नांवाच्या तेथील रहिवाशास देण्याचीहि प्रेरणा देवाने दिली. रेड्डीजी उभे झाले. "५० एकर कोरडवाहू व ५० एकर ओलीत जमीन मी देतों" म्हणून त्यांनी घोषणा केली. सारें वातावरण

पालटले ! ऋषीस मंत्र मिळाला !! देशास उपाय सापडला !!! आतां त्याचा भारत भर प्रचार करण्याची आवश्यकता होती.

**मंत्र व्यापक बनला**

विनोबाजी वर्ध्यास परत येत असतांना जमीन मागत मागत आले. त्यांना हैद्राबाद प्रांतांतून १२,००० एकर जमीन मिळाली. ते पावसाळ्यांत वर्ध्याजवळील पवनारमध्यें आपल्या जुन्या साधनेंत गढून गेले. सप्टेंबरमध्यें नेहरुजींनी सल्ल्याकरितां विनोबाजींना दिल्लीस बोलाविलें. विनोबाजी पुन्हा पायीं पायीं भूदानाचा प्रचार करीत दिल्लीस गेले. मध्येंच सागर शहरीं गांधीजींचा जन्मदिन लागला. त्या दिवशीं त्यांनी साऱ्या भारतांतील भूमिहीनाकरितां ५ कोट एकर जमीनीची मागणी केली. दिल्लीवरून ते रामकृष्णांच्या भूमींत-उत्तर प्रदेशांत-गेले. तेथील ५ लाख एकरांची प्राथमिक मागणी जवळजवळ पूर्ण झाली. तेथून ते भगवान् बुद्धाच्या प्रदेशांत-बिहारांत-गेले. बिहारांतील भूमिहीनांचा संपूर्ण प्रश्न सोडविण्याकरितां ३२ लाख एकराची त्यांनी मागणी केली. त्यापैकीं २२ लाख एकर जमीन त्यांना भूदानांत मिळाली आहे. बिहारांत लाखों एकर जमीन मिळूं शकते याचें एक नवीनच दर्शन सर्वांस झालें. तेथेंच त्यांनी १९५७ पर्यंत ५ कोट एकर जमीन आपण गोळा करून वाटूं या अशी घोषणा

केली. आजहि ते बिहारमध्येंच फिरत आहेत. आतां कार्यकर्ते प्रत्येक प्रांतांत भूदानयज्ञाचा संदेश फैलावत आहेत. सर्व भारतांत ३६ लाख एकर जमीन गोळा झाली आहे. आपल्या मध्यप्रदेशांत श्री दादाभाई नाईक यांच्या नेतृत्वाखालीं सर्वांच्या मदतीने प्रांतीय भूदानसमिति हें काम करीत आहे. आतापर्यंत जवळ जवळ ८०,००० एकर जमीन या प्रांतांतून गोळा झाली आहे.

## ५. 'भूदानयज्ञ' म्हणजे काय ?

आतां या पद्धतीचें भूदानयज्ञ हें नांव जगभर प्रसिद्ध झालें आहे. 'भू' म्हणजे जमीन. 'दान' शब्दाचा अर्थ भिक्षा नाही. विनोबाजी जुन्या अर्थानें 'दान' शब्द वापरत आहेत. दानाचा जुना अर्थ 'योग्य वांटणी' असा आहे. आज शेतांत मेहनत न करणाऱ्याजवळ शेकडों हजारों एकर जमीन आहे. जो [illegible] करतो त्याच्याजवळ एक गुंठा, [illegible] डेसिमल [illegible] नाही. हा न्याय आहे काय ! असाले [illegible] कोठून उत्साह वाटावा ! ज्यांच्या- मजुरास [illegible] जवळ पु[illegible] इंच इंच जागेची योग्य [illegible] काळजी [illegible] 'थोडीशी जागा न विकत्री [illegible] अशी त्यांची भावना।

म्हणून आजच्या वांटणीने श्रीमंतास व गरीबांस—कोणासहि —श्रम करण्याची प्रेरणा होत नाही. श्रमाशिवाय उत्पन्न कसें वाढणार ? उत्पन्न वाढल्याशिवाय देश व जनता समृद्ध कशी होणार ? म्हणून विनोबाजी म्हणतात—आजची वाटणी-आजची विषमता-अन्यायपूर्ण आहे. ती आपण बदलूंया. न्याय्य वांटणी करूंया. जमीनीची न्याय्य वाटणी म्हणजे भूदान. भूदानांत भिक्षा, हीनपणा आदि भाव नाहीत. विनोबाजी भूदान हा मेहनत करणाऱ्यांचा 'हक्क' म्हणून मागतात.

## आजची हास्यास्पद व्यवस्था

स्वयंपाक्यास जर टाक दिला व कारकुनास पोळपाट-लाटणें दिलें तर लहान मुलं सुद्धां या व्यवस्थेस हंसतील ! पण तशी हंसण्यासारखीच गोष्ट आपण आज शेती, कारखाने आदींच्या बाबतींत केली आहे. शेती स्वतः करीत नाही त्याच्याजवळ शेंकडों एकर जमीन व कसतो त्याच्याजवळ वितभरहि जमीन नाही. ही मूढ पद्धति बदलूंया. वकीलास; डॉक्टरास, व्यापाऱ्यास शेतीची काय जरूर ! त्यांस कायद्याचीं पुस्तकें, थर्मामिटर व तराजू पाहिजेत. पण यांच्याजवळ या वस्तुबरोबर शेतीहि आहे

• केली. आजहि ते बिहारमध्येंच फिरत आहेत. आतां कार्यकर्ते प्रत्येक प्रांतांत भूदानयज्ञाचा संदेश फैलावत आहेत. सर्व भारतांत ३६ लाख एकर जमीन गोळा झाली आहे. आपल्या मध्यप्रदेशांत श्री दादाभाई नाईक यांच्या नेतृत्वाखालीं सर्वांच्या मदतीने प्रांतीय भूदानसमिति हें काम करीत आहे. आतापर्यंत जवळ जवळ ८०,००० एकर जमीन या प्रांतांतून गोळा झाली आहे.

## ५. 'भूदानयज्ञ' म्हणजे काय ?

आतां या पद्धतीचें भूदानयज्ञ हें नांव जगभर प्रसिद्ध झालें आहे. 'भू' म्हणजे जमीन. 'दान' शब्दाचा अर्थ भिक्षा नाही. विनोबाजी जुन्या अर्थाने 'दान' शब्द वापरत आहेत. दानाचा जुना अर्थ 'योग्य वांटणी' असा आहे. आज शेतांत मेहनत न करणाऱ्याजवळ शेकडों हजारों एकर जमीन आहे. जो मेहनत करतो त्याच्याजवळ एक गुंठा, एक डेसिमलहि जमीन नाही. हा न्याय आहे काय ! अशाने मजुरास काम करण्यास कोठून उत्साह वाटावा ! ज्याच्याजवळ पुष्कळ आहे त्यानेहि इंच इंच जागेची योग्य काळजी कशी घ्यावी ! 'थोडीशी जागा न पिकली तरी आपणांजवळ पुष्कळच आहे' अशी त्याची भावना असते.

मी चढतों ह्याचें नांव चढाओढ. यांत गरीब हे पुण्यात्मे आहेत व श्रीमंत हे पापी आहेत असें नाहीं. चढाओढींत पास होणाराचें नांव श्रीमंत, नापास होणाऱ्याचें नांव गरीब. म्हणून आपण सर्वजण देऊं शकतों. तसें जमिनीचें गणित पाहिलें तर हिंदुस्थानांत श्रीमंत कोण आहे ?आपल्या देशांत शेतावर काम करणाऱ्या प्रत्येक माणसाच्या वांट्यास १ एकरहि शेती येत नाही. अशा स्थितींत माझ्या घरीं माणसें किती व जमीन किती हा प्रश्न प्रत्येकाने विचारावा व मजजवळ देण्यासारखें आहे कीं नाही त्याचें उत्तरहि ज्याचें त्यानेच द्यावें.

## हा यज्ञ आहे

ज्याच्याजवळ १ एकर शेती आहे तो तर गरीबच आहे. पण त्याच्यापेक्षांहि जमीन नसलेला जास्त गरीब आहे. म्हणून त्याने फूल नाहीं फुलाची पाकळी म्हणून १ डेसीमल जमीन या कार्यांत द्यावी. मोठे लोक मोठें दान देतील, लहान लोक आपल्या पोटास चिमटा घेऊन यज्ञांत देतील. सुदाम्याने तीन मूठ पोहे जसे दिले होते त्याप्रमाणे हें राहील. दान थोडया लोकांसाठीं असतें; पण यज्ञांत सर्वांना हिस्सा घ्यावा लागतो. म्हणून विनोबाजींनी यास 'भूदान-यज्ञ' म्हटलें आहे, नुसतें 'भूदान' नाहीं. गोवर्धन पर्वत

व जो मजूर यांच्या शेतींत घाम गाळतो त्याची शेती नाही. ही उलटी व्यवस्था आपण बदलूंया. 'सबै भूमि गोपालकी'. देवाने पंचमहाभूतें निर्माण केलीं. बाकीची हवा, पाणी प्रकाश आदि सर्वांच्या मालकीची आहेत. मग जमीनीवरच कांही थोडयांची मालकी कां ? हवा-पाण्याप्रमाणे जमीनहि देवाने निर्माण केली. मानवाने स्वार्थाने त्यावर मालकी हक्क स्थापन केला. म्हणून भूमाता ही पुन्हा सर्वांची होऊं द्या. जमीन कसणाऱ्याची झाली पाहिजे. उत्पादन करणाऱ्याच्या हातीं संपत्ति उत्पन्न करण्याचीं साधनें असलीं पाहिजेत. हा साधा न्याय आहे. विनोबाजीस भूदानयज्ञाने हेंच करावयाचें आहे. भूदान यज्ञ कशासाठीं ? उत्पादनाचीं साधनें उत्पादकाच्या हातीं देण्यासाठी.

## आपण सर्वच दोषी आहोंत

विनोबाजीची अपेक्षा आहे कीं ह्या न्याय प्रस्थापनेच्या कामांत सर्वांनी भाग घ्यावा. आपल्यापेक्षा कोणीतरी गरीब आहेच. त्याकरितां आपण आपल्याजवळून कांही तरी द्यावें. शेकडों एकर ठेवणारे श्रीमंतच दोषी आहेत असें नाहीं. पांच पचवीस एकर ठेवणारे आपणहि दोषी आहोंत. चढाओढीवर आधारलेली ही रचना आहे. दुसऱ्यास ओढून

निराळें आहे. या दानाने देशाचा प्रश्न सोडवावयाचा आहे. म्हणून फारच कमी देऊं इच्छिणारांनी पुन्हा विचार करावा. सहावा हिस्सा मागण्याचें दुसरेंहि एक कारण आहे. प्रत्येक घरांत लहानमोठे मिळून सरासरी पांच माणसें हिंदुस्थानांत पडतात. विनोबाजी म्हणतात–मला तुमचा सहावा मुलगा किंवा भाऊ माना. म्हणून मला माझा सहावा हिस्सा द्या. मला दरिद्रि-नारायणाचा प्रतिनिधि समजा. तुमच्या कुटुंबातला सहावा समजून मला माझा हक्क द्या. कुंती आपल्या सहाव्या मुलास–कर्णास–विसरली. म्हणून महाभारत झालें. तसलें गृहयुद्ध आपणास टाळावयाचें आहे. म्हणून विनोबाजी म्हणतात, 'सहाव्यास स्मरा.' परमेश्वरास विसरूं नका. दरिद्रि-नारायणाचाहि तुमच्या घरांत हिस्सा आहे. तो त्याला द्या. ही सहाव्या हिस्स्याची कथा झाली.

## कायद्याने हें होणार नाहीं

सर्वांच्या धर्मभावनेस जागृत करणारें एवढें प्रचंड काम नुसत्या कायद्याने होणार नाही. कायदा कदाचित् जमीन वांटू शकेल. आज भारताच्या घटनेंत खाजगी स्वामित्व मान्य केलेलें आहे. म्हणून फुकट जमीन वांटणें हेंहि सोपें काम नाही. आज कायदा करणाऱ्यांच्या आपल्या

उचलण्यास नुसती कृष्णाची करांगुळी अपुरी पडली. गव-ळ्यांच्या काठ्या ही लागल्या. तसेंच विषमतेचा हा राष्ट्रीय कलंक दूर करावयास सर्वांनी पुढे सरसावलें पाहिजे.

## सहावा हिस्सा कां ?

भूदान यज्ञांच्याद्वारें आपणांस कमींत कमी पांच कोट एकर जमीन भूमिहीनांना द्यावयाची आहे. हिंदुस्थानांत वाहितीखालीं अदमासें ३० कोट एकर जमीन आहे. जवळपास ३० कोटच लोक शेती करतात. यापैकीं पांच कोटी लोकांजवळ, म्हणजे एक कोट कुंटुंबाजवळ, स्वत:ची जमीन नाहीं. म्हणून प्रत्येक कुंटुंबास कमींत कमी ५ एकर जमीन द्यावयास पाहिजे. या हिशेबाने पांच कोटी एकर जमीन पाहिजे. ५ कोट हा ३० कोटींचा सहावा हिस्सा म्हणून विनोबाजी मध्यम शेतकऱ्याजवळून सहावा हिस्सा मागतात. श्रीमंत शेतकऱ्याजवळून त्याला लागणारी थोडीशी जमीन सोडून बाकीची सर्वच जमीन मागतात. यापैकीं पहला हफ्ता म्हणून सहाव्या हिस्स्याची मागणी त्यांच्याकडून चालू आहे. गरीब शेतकऱ्याने सहानुभूति व आपला धर्म म्हणून, थोडेसें द्यावें. श्रीमंतांनी फारच कमी जमीन दान दिली, तर विनोबा नाकारतात देखील. कारण हें दान इतर दानाहून

निराळें आहे. या दानानें देशाचा प्रश्न सोडवावयाचा आहे. म्हणून फारच कमी देऊं इच्छिणारांनीं पुन्हा विचार करावा. सहावा हिस्सा मागण्याचें दुसरेंहि एक कारण आहे. प्रत्येक घरांत लहानमोठे मिळून सरासरी पाच माणसें हिंदुस्थानांत पडतात. विनोबाजी म्हणतात—मला तुमचा सहावा मुलगा किंवा भाऊ माना. म्हणून मला माझा सहावा हिस्सा द्या. मला दरिद्रि-नारायणाचा प्रतिनिधि समजा. तुमच्या कुटुंबातला सहावा समजून मला माझा हक्क द्या. कुंती आपल्या सहाव्या मुलास—कर्णास—विसरली. म्हणून महाभारत झालें. तसलें गृहयुद्ध आपणास टाळावयाचें आहे. म्हणून विनोबाजी म्हणतात, 'सहाव्यास स्मरा.' परमेश्वरास विसरूं नका. दरिद्रि-नारायणाचाहि तुमच्या घरांत हिस्सा आहे. तो त्याला द्या. ही सहाव्या हिस्स्याची कथा झाली.

## कायद्यानें हें होणार नाहीं

सर्वांच्या धर्मभावनेस जागृत करणारें एवढें प्रचंड काम नुसत्या कायद्यानें होणार नाही. कायदा कदाचित् जमीन वांटू शकेल. आज भारताच्या घटनेंत खाजगी स्वामित्व मान्य केलेलें आहे. म्हणून फुकट जमीन वांटणें हेंहि सोपें काम नाही. आज कायदा करणाऱ्यांच्या आपल्या

प्रांतांत जास्तीत जास्त ५० एकर, १०० एकर जमीन ठेवण्याच्या चर्चा चालू आहे. पुष्कळ श्रीमंतांनी कायदा होण्यापूर्वीच आपापसांत वांटण्या करून टाकल्या आहेत. त्यामुळे अशा कायद्याने फारच थोडी जमीन गरिबांना वांटावयास मिळेल. हैद्राबाद प्रांतात असाच कायदा झाला आहे. तेथील सर्व भूमिहीनांना जमीन या कायद्याने मिळूं शकणार नाही. कोणता कायदा पांच पंचवीस एकरवाल्यां जवळून जमीन घेऊ शकेल ? म्हणून सर्वांत त्यागभावना आणण्याचें काम 'यज्ञच' करूं शकेल. 'लोभास कुंपण घाला' हा संदेश देण्याचें काम संतच करूं शकेल.

## माणुस बदलायचा आहे.

म्हणून भूदानयज्ञाने आजचा लोभी व स्वार्थी मनुष्य बदलायचा आहे. जुन्या जमान्यात एक पुरुष अनेक बायांशीं लग्न करत होता. तसेंच एक स्त्री अनेकांशीं लग्न करीत होती. तरीही तो पुरुष देवाचा अवतार मानला जात होता. ती बाई महा पतिव्रता मानली गेली. श्रीकृष्णाची व द्रौपदीची उदाहरणें सर्वांस ठाऊक आहेत. मध्यंतरी समाजांत ही लग्नाची कल्पना बदलली. आज आपण वाटेल तितक्या स्त्रियांशीं व पुरुषांशीं लग्न करूं शकतों. पुष्कळ प्रांतांत अशी लग्नें बेकायदा नाहीत. पण क्वचि-

तच कोणी पत्नी जिवंत असे पर्यंत दुसरीशीं लग्न करतो. अन्य सर्व स्त्रिया आपल्या आई समान, बहिणी समान वा मुली समान मानतो. अशा रीतीने आपण आपल्या कामवासनेस कायद्याशिवायच कुंपण लावलें, त्याचप्रमाणे हा आधुनिक संत तुम्हांआम्हां सर्वांस भूदानयज्ञाने विचारत आहे. आपल्या अर्थवासनेस म्हणजे लोभास कुंपण लावण्यांची वेळ आली नाहीं काय ? माणसास किती जमीन पाहिजे ? पांच, पंचवीस, पन्नास, शंभर, हजार-लाख एकर ? टॉल्स्टॉय या रशियन ऋषीने एका लोभी माणसाची एक सुंदर गोष्ट लिहिली आहे. त्यांत त्याला मरतांना साडेतीन हात जमीन पुरली असें दाखविलें आहे. तात्पर्य आपणांस मेहनत करून पोट भरण्यास थोडीशी जमीन पुरें व्हावयास पाहिजे. आपल्या देशांत जास्त जमीन नाहीं. आपण सर्व भारतमातेचीं लेंकरें म्हणवितों. मग आपल्या इतर बांधवांना वगळून जास्त जमीन ठेवावी काय ? आपण आपल्या इतर बांधवांची सोय पाहूं की आपणच पुष्कळशी जमीन बळकावून बसूं ? जो जास्त जमीन ठेवतो, तो दुसऱ्या कोणास जमीनीशिवाय ठेवत आहे. धरतीमातेची व तिच्या मेहनत करणाऱ्या पुत्रांची तो भेट घडूं देत नाहीं. मातापुत्राची ताटातूट करण्याचें त्यास पातक लागलें आहे. विनोबाजी त्यास या पापापासून मुक्त करूं इच्छितात.

## वाल्याचा वाल्मीकि

आपलें कुटुंब हेंच आपलें जग'आपण मानलें. म्हणून धर्म भावना विसरलों. म्हणून तर गरीबहि खोटेपणा करतो, श्रीमंतहि करतो. वाल्या कोळ्यासारखी आपली स्थिति झाली• साऱ्या गावास आपण आपलें कुटुंब मानूंया. मग आपण -पाप करणार नाही व स्वार्थ मर्यादित होईल. म्हणून विनोबाजी वाल्या कोळ्यास तारणाऱ्या नारदाचे आज काम करीत आहेत. जुन्या यज्ञांत नारळाची, तुपाची आहुती देत असत. या यज्ञांत आपण आपल्या लोभाची आहुती देऊंया. या यज्ञाने आपणास आपला लोभ जाळावयाचा आहे. म्हणून मन बदलण्याचा, बुद्धि शाबूत करण्याचा हा प्रयत्न आहे. या यज्ञाने भारतांतील सर्व खळमळ धुवून काढावयाचे आहेत. तात्पर्य भूदानाने नवीन मानव निर्माण करावयाचा आहे. आजचा जुना व आपल्या कुटुंबास जग समजणारा मानव ,यापुढें चालणार नाही. मोटारीचे व आगगाडीचे मॉडेल दरवर्षी बदलत आहे. आता माणूसहि बदलला पाहिजे. जग आज जवळ आलें आहे. आपणास आपली कुटुंब भावना विशाल केली पाहिजे. दरेक आपलाच स्वार्थ पाहूं लागला तर आपण टिकणार नाही. भूदान

यज्ञ कशासाठी ? साऱ्या भारतियांची शुद्धि करण्यासाठी. सर्वांचा लोभ मर्यादित करण्यासाठी.

## यानेच अंत्योदय होईल

स्वराज्यांत सरकारी अधिकाऱ्यास बढत्या मिळाल्या. काही देशभक्तांचा असेंब्लींत व पार्लमेंटांत शिरकाव झाला. शेतकऱ्यांस वाढत्या प्रमाणांत तकावी मिळूं लागली. शिकलेल्यांस नोकऱ्या मिळाल्या. पण मजुरास काय मिळालें ? मजुरांच्या झोंपडी झोंपडींत स्वराज्य आणून पोहोचविण्याकरितां हा भूदान यज्ञ सुरू झाला आहे. श्रीमंतांचा ताठरपणा जावा, गरीबांची हीनता जावी. श्रीमंत जगावा व गरीब जगावा; पण श्रीमंती जावी व गरीबी जावी म्हणून भूदान यज्ञ. आईस सर्व मुलें सारखीं असतात. पण ती सर्वांत अशक्त हाडकुळ्या मुलाची जास्त काळजी घेते. त्याच्या सेवेंत सर्वांची सेवा येऊन जाते सर्वोदयांतही सर्वांत जास्त हेळसांड झालेल्या खेड्यांतील मजुरांची दशा सुधारण्याचा प्रथम प्रयत्न आहे. भूदानयज्ञ कशासाठीं ? शेवटच्या माणसाच्या उदयासाठीं !

## समाजांत निर्भयता आली पाहिजे

आज सारा समाज भीतीने व मत्सराने ग्रासलेला आहे. गरीब श्रीमंतांचा द्वेष करत आहेत. श्रीमंतहि 'गरीब माजले'

म्हणून सांगत आहेत. गरीबास हालअपेष्टांची, उपासमारीची, मुलांबाळांच्या शिक्षणाची भीति आहे. श्रीमंतास आपल्या पैशामुळे आपल्या जीविताबद्दल भीति निर्माण झाली आहे. जवळ पैसे असतांना घरीं पोहोंचवायास रात्र झाली, तर आपणही भितों. भूदानयज्ञाने समाजांतील ही गरीब श्रीमंतांची भीति पार नाहींशी करावयाची आहे. गरीबांची गरीबीं नष्ट झाल्यास त्यांची उद्याची भीति दूर होईल. श्रीमंताची श्रीमंती नष्ट झाली म्हणजे त्यांचीहि भीति दूर होईल. समाजांतील द्वेष, मत्सरहि शमेल.

## भेदाभेद सर्व अमंगळ

आधींच भारत धर्म, जाति व प्रांत भेद यांनी पोखरलेला. आपण आपलें राज्य यामुळेंच इंग्रजांस घालविलें. आतां स्वराज्यांत हे भेद तर कायम आहेतच. उलट श्रीमंत व गरीब हा भेद मोठा झाला. श्रीमंती व गरीबी पूर्वींहि होती. पण आतां गरीबांचे संघ होऊं लागले, श्रीमंतांचा द्वेश होऊं लागला. हा भेद तर प्रत्येक गावांत व शहरांत आहे. असा भेदांनी पोखरलेला हा हिंदुस्थान कधीं एकदिलाचा होऊं शकेल काय ? म्हणून हा भेद नष्ट करण्याकरितां भूदानयज्ञ आहे. भूदानयज्ञ कशासाठी ? भेद नष्ट करण्यासाठी.

**स्वराज्यांत प्रत्येकास वाव**

स्वराज्यांत प्रत्येकाने आपआपलें कसब दाखवून हें राष्ट्र समृद्ध केलें पाहिजे. पण मजूराच्या मालकीची तसू-मरहि जमीन नाही; किंवा कोणताहि धंदा नाही. त्यांनी आपलें कसब कोठें दाखवावें ? ज्याची स्वतःची १ इंचहि जमीन नाही, त्यांना देश स्वतःचा कसा वाटणार ? त्यानें देशाकरिता कां त्याग करावा ? स्वातंत्र्य रक्षणाकरिता मरण्याची प्रेरणा त्यास कोठून होणार ? शेती किंवा स्वतंत्र रोजगार गरीबाला मिळेल तेव्हांच खऱ्या अर्थाने ते स्वतंत्र होतील.

## ६. भूदानयज्ञ-मूलक क्रांति

म्हणून विनोबाजी प्रत्येकास स्वाभिमानाचा एक तरी धंदा देऊं इच्छितात. खेडयांतील शेतीशिवाय व सुतारी-लोहारी-शिवाय सर्व धंदे बुडाले. अशा स्थितींत यांना शेती दिली पाहिजे. दुसरे धंदेहि जिवंत केले पाहिजेत. दुसरे धंदे जिवंत करण्यास कांहीं काळ लागेल. म्हणून शेती वाटण्याने आपण सुरुवात करूंया. म्हणून ही क्रांति भूदानयज्ञ मूलक आहे. जमीनीची फेरवाटणी हें तिचें मूळ.

खेड्यांतील उद्योगधंदे भरभराटीस आणणें हें तिचें महत्वाचें अंग आहे. म्हणून ही क्रांति ग्रामोद्योग प्रधान राहील. हें *सर्व काम शांतीनें करावयाचें आहे. म्हणून ही अहिंसक* क्रांति राहील.

## १९५७ पर्यंत ही क्रांति पूर्ण करूंया

हें सर्व काम आपणांस लौकरांत लौकर करावयाचें आहे. १९५७ पर्यंत म्हणजे पुढील तीन वर्षांत आपणांस जमीनीची वांटणी करतां आली पाहिजे. १७५७ मध्यें या देशावर *इंग्रजी राज्याचा प्रारंभ झाला. १८५७ मध्यें* स्वराज्यस्थापनेचा प्रयत्न सुरु झाला. १९५७ पर्यंत स्वराज्यांत खेडेगांवांतील शेत मजूरास शेती मिळाली पाहिजे. कारण आजचें विसावें शतक हा विमानाचा काळ आहे. या काळांत कामें झटपट होतात. जो हळूंहळूं काम करील, त्या.करितां काळ वाट पाहणार नाहीं. लोकांनी गढूळ पाणी पिण्यास सुरुवात केलेलीच होती. आपण त्यांना शुद्ध पाणी त्वकर दिलें पाहिजे. क्रांति त्वकर होत असते. सुधारणा हळूंहळूं चालत राहते. आपणांस क्राति करावयाची आहे. म्हणून १९५७ पर्यंत एवढें काम आपण पूर्ण करूंया.

# ७. तीसरा मार्ग जनशक्ति निर्माण

. तसेंच हें काम आपणास शांतीने करावयाचें आहे. महात्माजींनी आपणांस अहिंसेचा मंत्र दिला. त्यांनी परक्यांचें भांडण अहिंसेने मिटविलें. हें तर आपल्याच देशांतील भांडण आहे. हें भांडणहि नव्हे. प्रेमाचा रुसवा-फुगवा आहे. कारण जमाना बदलला हें श्रीमंतहि समजले आहेत. म्हणून सर्व श्रीमंतांना आपण समजावूंया. सर्व गरीबांना आपण समजावूंया. समजावून दान दिल्याने लोकांची शक्ति प्रकट होईल. व मग कायद्याच्या शक्तीची–दंडशक्तीची–आवश्यकताच पडणार नाहीं. आवश्यकता पडली तरीहि लोकशक्ति प्रकट झाल्यावर कायदा चांगला बनेल. लोकांना ती जबरदस्ती वाटणार नाही. अन्यथा लोक कायद्यांतून पळवाटा काढतील. म्हणून मुख्यतः हें काम जनशक्तीनेच व्हावयास पाहिजे. शारदा बिल पास झालें. पण आम्ही लग्नें करतांना तो कायदा सर्रास मोडत आहोत. याचें कारण एका सुधारकाच्या मताने तो कायदा झाला. जनतेपर्यंत ती तळमळ पोहोंचली नव्हती. म्हणून जमीनीची वांटणी जनशक्ति मार्फत होऊं द्या. एकवेळ ह्या शक्तीस प्रकट होऊं द्या. हिच्या उपासनेंत–ती प्रकट

करण्यांत—आपण आपलें तन, मन, धन वेंचूंया. लोकांच्या मताची भीक दरपांच वर्षांनें मागणाऱ्या सरकारजवळ जर एवढी मोठी शक्ति आहे, तर प्रत्यक्ष जनतेजवळ केवढी शक्ति असेल ? विहिरींतून काढलेल्या बादलींत प्रत्येक वेळेस जर एवढें पाणी येतें तर विहिरींत किती पाणी असेल ? गांधीजींनी कोणत्या शक्तीच्या बळावर लाखोंना त्याग करण्यास लावलें ? लाखों लोक आजही तीर्थयात्रेला दंड्याच्या भीतीनें जातात काय ? आई आपल्या मुलास कोणत्या कायद्यानुसार दूध पाजतें काय ? म्हणून आपण जनतेस जमीनीच्या न्याय्य वांटणीचा हा विचार पटवूंया. जेथें शक्यतोंवर कायद्याची शक्तिहि वापरायची नाहीं, तिथें खून खराबीची—हिंसेची—गोष्टच कशाला ? म्हणून, विचारशासन हेंच आमचें शस्त्र. आमचा विचार समजल्याशिवाय कोणी जमीन देईल तर आम्हांस दुःख होईल. कसेंहि करून जमीन जमविणें हा आमचा उद्देश नाही. विचार प्रचारावरच आमची सर्व भिस्त आहे. कायद्याच्या शक्तीहून अलग व हिंसेच्या विरोधी अशी स्वतंत्र लोकशक्ति आपण निर्माण करूंया. एकवेळ ही प्रगट झाली कीं हिंदुस्थानचे सर्व यक्षप्रश्न सुटतील. कारण ही शक्ति मुळांत शुभ आहे. ती

आज झोपली आहे. हनुमंताच्या शक्तिप्रमाणे लोकांना आपल्या शक्तीचा विसर पडला आहे.

## ८. भूदान हें सर्वोदयाचें पहिलें पाऊल

या लोकशक्तीच्या बळावर नुसत्या जमीनीची फेरवांटणी करायची एवढेंच कारण नाही. भूदान यज्ञ म्हणजे नुसती जमीनींची फेरवांटणीची चळवळ नाही. जमीनींची फेरवांटणी ही तर सर्वोदयाची पहिली पायरी आहे. एका संपूर्ण क्रांतीचा तो पहिला टप्पा आहे. संपत्तीचीहि फेर-वांटणी करावयाची आहे. गावोगांव शेतीबरोबरच छोटे-छोटे उद्योग चालतील. सर्व मेहनत करतील. मधमाशा प्रमाणे सर्व उद्योगी राहतील. गांवोगांव तेजस्वी प्राणवान शिक्षणाची सोय होईल. सर्वांच्या आरोग्याकडे गांव लक्ष देईल. एकंदरीत सर्वोदयांत सर्वांचें कल्याण होईल. उच्च व नीच हा भेद राहणार नाही. सर्वत्र न्याय राहील. भरण-पोषण, शिक्षण, आरोग्य, रक्षण आदि गांवचीं कामें गांवांतच चालतील आजचे राजनैतिक पक्षभेद क्षीण होतील. आज सर्वच पक्षांत सज्जनहि आहेत व दुर्जनहि आहेत. आज इलेक्शनच्या वेळीं कौरव-पांडव युद्ध चालतें. विनोबाजींस त्या ऐवजीं राम-रावण युद्ध करावयाचें आहे.

म्हणजे १९५७ पर्यंत सारी सत्प्रवृत्ति भूदान यज्ञाच्या पद्धतीने एकत्र आणावयाची आहे. देशासमोर सर्वमान्य कमींत कमी कार्यक्रम ठेवावयाचा आहे; व शेवटीं समाजास शासनमुक्त व्हावयाचें आहे. ही आहे भूदानाची लोकनीति. आतां गटबाजीची राजनीति आपण संपवूंया. सर्वोदयाच्या लोकनीतीची आपण उभारणी करुंया. म्हणून सत्तेचीहि वांटणी करावी लागेल. अशा समाजांत सर्व मेहनत करतील, ना कोणास मालकाची भीती ना सरकारची. मेहनत करणाऱ्यांना मेहनतीचे पुरें फळ मिळेल.

## ९· साम्यवाद कीं साम्ययोग

५-७ एकर जमीन वांटल्याने पूर्ण सुख होणार नाहीं हें कोणासहि समजतें. म्हणून वरील सर्व गोष्टी आपणास करावयाच्या आहेत. गुलामींतून 'स्वराज्य' आपण मिळविलें. आतां स्वराज्यांतून 'समता' आणूंया. आणि समतेच्या स्थिर पायावर समृद्धीचें मंदिर बांधूंया. अशा सर्वांच्या भल्याच्या कामाकरिता वाद कशास हवा? भूदानाने व संपत्ति-दानाने काय श्रीमंत उपाशी मरतील? ते अंग मेहनत करण्याची हळूं हळूं संवय करतील. विलास आटोपता घेतील. याने त्यांचें आरोग्य सुधारेल. शेती शिवाय दुसरीं

अनेक क्षेत्रें खुलीं आहेत. त्याने उदरभरणाचा प्रश्न सुटेल. खरी देश सेवा ही होईल. सर्वस्व तेथेंच टाकून पाकिस्तानातून येणारे आमचे सिंधी व पंजाबी बांधव जर भारतांत उपाशी मेले नाहीत, राज्य गेल्यावरहि जर एकहि इंग्रज उपाशीं मेला नाही, तर कालचे श्रीमंत कां उपाशी राहतील ? ते सेवा करावयास लागले तर त्यांना कोण उपाशी राहूं देईल ? म्हणून आम्हांस साम्यवाद नको. आम्हास सर्वांची फाटलेलीं मनें जोडावयाची आहेत. श्रीमंतांच्या बुद्धीचा व गरीबांच्या शक्तीचा राष्ट्रहितार्थ उपयोग करावयाचा आहे. म्हणून आम्हांस साम्ययोग पाहिजे. अशाप्रकारें भारतमातेचें मंदिर बनवावयाचें आहे. याची सुरुवात भूदान यज्ञाने होत आहे. भूदान यज्ञ हें पहिलें पाऊल आहे.

## १०. भूदान यज्ञाचे पैलू—संपत्तिदान

म्हणून भूदान यज्ञाला हळूं हळूं अनेक पालव्या फुटल्या. या वृक्षास अनेक फुलें लागलीं. नुसती जमीन वांटण्याने काम होणार नाही. संपत्तीहि वाटावी लागेल. त्याची सुरुवात म्हणून विनोबाजी संपत्तीदान मागतात. भूदानाप्रमाणेच याही क्षेत्रांत आज सहाव्या हिश्याने सुरुवात झाली आहे.

जमीन सर्वच ईश्वरनिर्मित आहे. थोडा विचार केल्यास संपत्तीहि समाजनिर्मित आहे हें चटकन समजेल. एकटा मनुष्य इतरांच्या मदतीशिवाय फारसें पैदा करूं शकणार नाहीं. ज्यास आपल्या बुद्धीचा वा शक्तीचा गर्व असेल त्याने जंगलांत जावें. तेथें आपलें कर्तृत्व दाखवावें. लाकडें तोडण्यास कुऱ्हाड लागेल. ती बनविण्यांतहि अनेकांचे श्रम खर्ची पडलेले. नुसत्या हाता-पायांनी हा अभिमानी काय करणार ? आपली बुद्धि, शक्ति, ज्ञान आदि सर्व वस्तूंत समाजाच्या सहयोगाचा मोठा हिस्सा आहे. म्हणून संपत्ति समाजाची आहे. आपणहि श्रम केले म्हणून त्यांत आपलाहि गरजेपुरता हिस्सा आहे. म्हणून आपण पैदा केलेल्या संपत्तींतून समाजाचा हिस्सा समाजास देऊंया. भारतांत एक कुटुंबाचें वार्षिक उत्पन्न १,५०० रु. च्या जवळपास येते. या रकमेहून जास्त उत्पन्न असणाऱ्यांनी या यज्ञांत भाग घेतलाच पाहिजे. गरीबांनी सहानुभूति म्हणून रुपयांत अर्धाआणा किंवा महिन्यांतून एक दिवसाची कमाई द्यावी. जोपर्यंत आपण कमाऊं तोपर्यंत हा हिस्सा द्यावयाचा आहे. प्रथम हें कांहींना कठिण वाटेल. त्यांनी आरंभीं पांच वर्षें देण्याचा संकल्प करावा. या पांच वर्षांत जन्मभर देण्याकरितां मन स्थिर करायचें आहे.

## संपत्तिदानाची नवीन पद्धति

ही 'संपत्तिदानाची रक्कम कोणत्याहि संस्थेस किंवा फंडास द्यावयाची नाही. आपल्याहून जास्त गरीबाकरितां विनोबाजी सांगतील त्याप्रमाणे रक्कम दात्यानेच खर्चावयाची आहे.तोच हिशेब ठेवील. दाताहि खर्चाबाबत आपल्या सूचना मांडू शकेल. ही रक्कम जमीन ज्यांना वाटली त्यांना औजारें देण्यांत खर्च होते. तसेंच जे सेवक ग्रामसेवा करतात त्यांच्या निर्वाहाकरितां खर्च होईल. सत्साहित्य प्रचारांतहि ही रक्कम खर्च केली जाऊं शकते. ज्याप्रमाणे आपलें उत्पन्न वाढेल किंवा कमी होईल त्याप्रमाणे ही रक्कम वाढेल वा घटेल हा एक धर्मविचार आहे. आज तर नुसती संपत्तीच्या हिस्या-चीच मागणी आहे. उद्यां संपत्ति कशी कमाविली याचाहि विचार आपणांस करावा लागणार आहे. समाजविरोधी धंदे आपणांस सोडावे लागतील. संपत्तिदानांत प्रत्येकाने हिस्सा घेतला पाहिजे. कारण जमीन कोणाजवळ आहे, कोणाजवळ नाहीं. पण् संपत्ति प्रत्येकजण कमावतो. गरीबांत गरीबहि रुपयांतून अर्धा आणा देऊं शकतो. दान व दया हे आत्ता-पर्यंत व्यक्तिगत गुण होते. संपत्तिदानाने व भूदानाने त्यांस सामाजिक स्वरूप द्यावयाचें आहे. आज बुद्धीने कमाव-णाऱ्यांस जास्त पैसा मिळतो. श्रमजीवी यांस पैसा अल्प

मिळतो. त्यांची समाजांत कदरहि नाही. हे सर्व भेद संपत्ती-दानाने नष्ट करावयाचे आहेत.

## ११ अन्यदानें

### (अ) साधनदान

संपत्तिदानाबरोबरच साधनदान, श्रमदान व बुद्धिदान आलें. नुसती जमीन देऊन फार मोठा उपयोग नाही. आपणांस सालंकृत कन्यादान केलें पाहिजे. म्हणून ज्या जनतेनें जमीन दिली, ती जनता साधनेहि देईल. बी, औजार, बैल जोडया आदि सामग्रीहि दानांत विनोबाजी मागतात. लोक देतातहि. विनोबाजी आया-बहिणी जवळून दागिन्यांचें दान मागतात, त्याचा उपयोग मुख्यतः शेतांत विहीरी करण्याकरिता करावयाचा आहे.

### (आ) श्रमदान

शिक्षितांनी, विद्यार्थ्यांनी व मजुरांनी श्रमदान द्यावें. श्रमदानाचा उपयोग मुख्यतः पडित जमीन तोडण्यांत किंवा नवीन शेतकऱ्यास मदत म्हणून होईल. शिक्षितांनी व विद्यार्थ्यांनी श्रमदान दिलें तर श्रमप्रतिष्ठाहि वाढेल. याशिवाय गांवांत रस्ते करणें, शाळा बांधणें आदि सार्वजनिक कामांकडेहि श्रमदानाचा उपयोग होऊं शकेल. पण मुख्य उपयोग उत्पादक कामांकडेच करावयाचा आहे.

## (इ) बुद्धिदान

शिक्षितांकडून बुद्धिदानाची विशेष अपेक्षा आहे. त्यांनी विकाररहित बुद्धीने भूदान यज्ञाची तात्त्विक भूमिका समजून घ्यावी. समजल्यानंतर त्याचा प्रचार करावा. त्याशिवाय प्रत्येक झोंपडीपर्यंत हा विचार कसा जाणार? विचार गेल्याशिवाय मालकी हक्काची पकड, स्वार्थाची मगरमिठी कशी ढिली होणार? काल्च्या शिक्षितांनी स्वराज्याचें लोण गांवोगांव नेलें. तें प्रत्येक झोंपडीपर्यंत गेलें नव्हतें. प्रत्येकाने स्वराज्य मिळविण्यांत त्याग केला नाही. म्हणूनच आजची बराचशीं दु:खें आहेत. म्हणून ही क्रान्ति प्रत्येक चुलीजवळ नेऊंया. प्रत्येक स्त्रीस हा विषय समजूं द्या. प्रत्येक लहान मुलामुलींस गाण्यांच्याद्वारें, व शाळांतून हा विषय कळूं द्या. प्रत्येकास या क्रान्तीचा स्पर्श होऊं द्या. म्हणजे क्रांति अमोघ होईल. मग प्रति-क्रांतिची भीति नाही. म्हणून घरोघर या क्रांतीचा संदेश पोहोंचविण्याची शिक्षितांवर विशेष जबाबदारी आहे. त्यासाठीं क्रान्तीचें स्वस्त साहित्य निघालें आहे. त्याचे वर्ग चालतील, क्रांतीचें 'सर्वोदय' नांवाचें मासिक निघतें. 'साम्ययोग' नांवाचें साप्ताहिक निघतें. तें गांवोगांव जाईल व घरोघर ऐकविल्या जाईल अशी व्यवस्था शिकलेल्यांनी करावयास हवी. म्हणून शिक्षितांची

जबाबदारी महान् आहे. आम्हास या आमच्या जबाबदारीचें भान होवो.

## १२. जीवनदान

हें सब कांम कोण करणार ? आपला देश फार मोठा. लोकसंख्या ही भरभक्कम. बहुतेकांस लिहिणें वाचणेंहि येत नाही. पांच लाख खेडीं आहेत. इलेक्शनमध्यें एक आठवडा काम केले व मग झोंपलों—अशानें हें काम होणार-नाही. याकरिता जनतारूपी महादेवावर विचाररूपी धारेचा सतत अभिषेक पाहिजे त्याशिवाय १९५७ पर्यंत या क्रांतीचें पहिलें पाऊल कसें पूर्ण होणार ? थोर जयप्रकाशजींनी हें सर्व पाहिलें. म्हणून त्यांनी ६ महिन्यापूर्वी आपलें जीवनदान या क्रांतीस दिलें. इतरांकडून अपेक्षा करण्याचाच अवकाश, शेंकडों लोकांनी दुसऱ्या दिवशींच जीवनदान दिलें. आपल्या प्रांतांतून ५० लोकांनी जीवन-दान दिलें. पण एकट्यानें कसें काम चालेल ? म्हणून समजून-उमजून लाखों लोकांनी भाग घेतला पाहिजे. प्रत्येक खेड्यांतून एक जीवनदानी निघाला पाहिजे अशी जयप्रकाशजींची अपेक्षा आहे. जीवनदात्यानें बाकीची सर्व संसारिक वा अन्य सुधारणेचीं कामें गौण ठरावयाचीं आहेत.

एका म्यानांत दोन तरवारी राहू शकणार नाहीत. स्वतःच्या संपत्तीचा योग्य भाग दानांत द्यावयाचा आहे. सर्व देण्याची तयारी करावयाची आहे. हें भूदान यज्ञाचें काम मुख्य मानावयाचें आहे. हे जीवनदाते स्थानिक भूदान समितीच्या कार्यास वेगवान व प्राणवान करतील. सर्व मिळून कार्यक्रम आंखून काम करतील. जीवनदात्यांच्या भरण-पोषणाची चिंता समाज वाहील. आज जो समाज लाखों भिकाऱ्यांना व साधूंना उपाशी मरूं देत नाहीं, तो या नवीन क्रांतीच्या पाइकांची हेळसांड करील काय ! समाजांत पूर्वी वानप्रस्था-श्रम होता. त्यामुळे शेंकडा २५ लोक नेहमी सेवा कार्यास मिळत असत. आज तर जयप्रकाशजींची प्रत्येक गांवांमागे एका सेवकाची अपेक्षा आहे. ही तर फारच अल्प आहे. ती आपण पूर्ण करूंया.

## १३. शंका समाधान

### (अ) कायद्याने मानसिक क्रांति होत नसते

पण मग लोक विचारतात कायद्यानें हें कां करत नाहीं ? सर्वांचा लोभ कमी करण्याचें काम, सर्वांत इमान-दारी आणण्याचें काम कायद्याने होणार नाहीं. कायदा मानसिक क्रांति करूं शकणार नाहीं, त्यांचा फायदा घेऊं शकेल. याची सविस्तर चर्चा मागे आलेलीच आहे.

## (आ) शेती बरोबर अन्य संपत्तीहि वांटावयाची आहे

लोक म्हणतात–नुसत्या खेड्यांवरच हा भार कां? उत्तर सोपे आहे. ज्याच्याजवळ जमीन नाही त्याकरित संपत्तिदान यज्ञहि सुरु झाला आहे. तो वाढणार आहे.

## (इ) शेतीने आरंभ कां ?

आपल्या देशांत शेती हा मुख्य धंदा आहे. सर्व वस्तु पृथ्वीपासून पैदा होतात. कारखान्यास लागणारा कच्चा मालहि जमीनींतूनच निघतो. म्हणून भूदानाने प्रारंभ झाला. सर्वांत वाईट दशा शेतमजुरांचीच आहे. त्यामानाने शहरांतील मजूर थोडा सुखी आहे. आई सर्वांत रोगी मुलाची शुश्रूषा प्रथम करते. हैद्राबादेंत तात्कालिक मागणीहि जमीनींची उद्भवली. म्हणून 'भूदानाने' सुरुवात झाली. शेतीसारख्या महत्वाच्या धंद्यांत समता आल्यावर इतरत्र समता आणण्यास कोण अडवूं शकेल ?

## मजुरांची अक्कल वाढेल

आज जे मजूर काम करीत आहेत ते यंत्राप्रमाणे जडवत् काम करतात. त्यांची बुद्धि, मन त्यांत नाही. तेच स्वतःच्या घरीं, मन लावून काम करतात. गांवोगांवचा हा अनुभव आहे कीं मजूर पूर्वींच्या मानाने आज तेवढयाच

कामास दीडपट दुप्पट दिवस लागतात. अशारीतीने चुकीच्या आर्थिक रचनेने राष्ट्राची श्रमशक्ति बरबाद होत आहे. मजुरांच्या बुद्धिचाहि विकास होत नाही. लोक म्हणतात की मजुरांत अक्कल नाही. म्हणून त्यांनी दुसरे सांगतील त्याप्रमाणे करावें असा विचार करणें ही अहिंसेची रीत नव्हे. त्यांच्यांत जी कांहीं अक्कल आहे तीच आपणांस वाढविली पाहिजे. त्यांना जमीन देण्याने त्यांची अक्कल वाढणार आहे. त्यांना जमीन देणें म्हणजेच तें भूदान यज्ञ. स्वतःची जमीन झाल्यास मनुष्य अक्कल वापरील. पूर्ण शक्ति उपयोगांत आणील. एखाद्या भांडवलवाल्याची अक्कल एखाद्या मजुरापेक्षा जास्त असेल, पण मजुराची अक्कल कमी म्हणून ती सोडून दिली तर राष्ट्रांत त्यांचीच संख्या जास्त असल्यामुळे बेरीज त्यांच्या अक्कलेचीच जास्त भरेल. म्हणून त्यांची उपेक्षा करण्यांत देशाचा एकूण तोटाच होईल.

## (ई) दानांतील जमीनीचा दर्जा

आज दानांत पुष्कळशी वाईट जमीन मिळाली आहे. असे लोक म्हणतात. पण वाईट जमीनीलाहि कांहीं किंमत आहेच. तेवढा लोभ तर सुटला. वाईट जमीन सुधारलीहि जाऊं शकेल: जिची लवकर सुधारणा होऊं शकत नाही, ती जमीनहि

एकाच्या मालकीची कां ठेवावी? तीहि गांवाची होऊं द्या. या जमीनींत कदाचित लवकर पीक होणार नाही. तेवढा नरी मालकी हक्क सुटलाच कीं नाही? पुष्कळशी बऱ्यापैकींहि जमीन यज्ञांत मिळाली आहे. दरभंग्याच्या महाराजाने लाख एकराहून अधिक जमीन दिली. ती सर्व बऱ्यापैकीं आहे. हातहातभर धुऱ्याकरितां कोर्टांत जाणारे लोकच आज–रद्दी कां होईना–देण्यास सुरुवात तर करीतच आहेत. विहिर खणतांना प्रथम माती, मुरुम, चिखल लागणारच. नंतर निर्मळ पाणी लागणार. येथेंहि तसेंच आहे. रद्दी जमीन मिळाली' म्हणून चांगली जमीन मागणें सोडलें नाही. तीहि मिळेल. शेवटीं सर्वच जमीन गांवाची करावयाची आहे. १ जमीन देणें आहे ही त्याची पहिली पायरी आहे.

## (उ) लहान तुकडे व शेती

याने जमीनीचे तुकडे होतील असे लोक म्हणतात तें खरेंहि असेल.' पण आजहि बहुतांश शेतीची मालकी व छोट्या तुकड्यांतच आहे. पाण्याची सोय असली तर छोट्या तुकड्यांत पीक जास्त येतें. विनोबाजींचा परंधाम आश्रमाच्या व सेवाग्राम आश्रमच्या शेतीवरून हें सिद्ध झालें आहे.

हाच चीन-जपानचा अनुभव आहे. शेवटीं आपणांस याच रस्त्याने जावें लागेल. पुन्हा आजची अलग अलग शेती

हींच कांहीं शेवटची अवस्था नव्हे. सहकारी लोकांची तयारी झाल्यावर व शेती सामूहिक शेतीहि होऊं शकेल. ही तयारीहि आपण करूं. पण आजचा मुख्य प्रश्न गरीब व श्रीमंतांच्या हृदयाचे झालेले तुकडे जोडणें हा आहे. कपडा शिवण्याकरितां शिंपी प्रथम कापडाचे तुकडे करतो. तशांतलाच हा प्रकार आहे. शेवटीं तर सर्व शेती गांवाची करावयाची आहे. फारच छोटा तुकडा कोणी घेण्यास तयार नसल्यास बहुधा दात्याकडेच ठेवतात. तो विश्वस्त म्हणून त्यास बाळगतो. त्यांतील खर्च वजा जातां उत्पन्न ग्राम-कल्याणास लावतो. तुकड्यांची अदलाबदल करून सलग शेतीहि भूदानांत मिळूं शकते. दोन-चार लोक मिळून बैलजोडी ठेवतील प्रत्येकास बैलजोडी देण्याची आवश्यकताहि नाही. बैलजोडी भाड्याने मिळूं शकेल. श्रमाच्या मोबदल्यांत बैलजोडीची अदलाबदल होईल. मध्यंतरीच्या काळांत श्रीमंतांस श्रमशक्तीची जरूर लागेल व गरीब भूमिपुत्रास बैलजोड्या लागतील. दोघांचीही सोय अदला-बदलीनें होऊं शकेल.

(ऊ) याने उत्पादन वाढेल

याने उत्पादन घटेल असें लोक म्हणतात. अनुभव तर असा आहे कीं उत्पादन थोडें बहुत वाढलेंच आहे. वर्धा

तहसीलींत ३ वर्षांपूर्वी २०० एकर जमीन वाटली. उत्पादन कोठेंहि कमी झालें नाहीं हाच अनुभव आहे. जास्त मन लावून दाता उरलेल्या जमीनींत काम करील. नवीन भूसेवक मन लावून नवीन जमीनींत काम करील. म्हणून उत्पादन वाढण्याचीच शक्यता आहे. समजा उत्पादन् थोडेसें घटलेंहि तरी याने द्वेष कमी होईल, इमानदारी वाढेल, सुख शांति वाढेल, समाजांत न्याय येईल.

उत्पादन उत्पादनाकरिता नसतें. शेवटीं उत्पादनहि समाजांत सुख वाढावें म्हणूनच असतें. पण शेवटीं उत्पादनांत घट ही भीती अनाठायीं आहे.

## (ए) मालक मजूर संबंध

'आम्हांस मजूर मिळतील काय' हा प्रश्नहि विचारला जातो. भूदान चळवळीमुळे मजूर माजला असेंही कांहीजण म्हणतात. मजूर तर पूर्वीपासूनच हळूंहळूं काम करूं लागला होता. हैदराबादेंत स्फोट झाला. करितां तापावर औषध म्हणून विनोबाजींनी क्विनीन दिले आतां क्विनीनने ताप आला असें लोक म्हणतात. वास्तविक असें नाहीं. मजूरानेहि इमानदारीने काम केलें पाहिजे हेंच भूदान यज्ञाचें कार्यकर्ते सांगतात. आळसाने, अज्ञानाने व दुर्गुणाने काल मजुरांची

जमीन गेली. हे दुर्गुण कायम राहिले तर जमीन मिळूनहि भरभराट होणार नाही. म्हणून मजुरांनी आळस सोडावा. शेवटच्या अवस्थेत मेहनतीकरितां आवश्यक एवढीच जमीन प्रत्येकाजवळ राहणार आहे. म्हणून मजुरांची गरजच भासणार नाही. मध्यंतरीच्या काळांत मजूर मिळावे व प्रामाणिक मजूर मिळावे हीच कल्पना आहे. वर्धा तहसिलींत अेकूर्ली ह्या गांवीं सर्वांजवळ शेती आहे. तेथें कांही श्रीमंतहि आहेत. तेथें मजुरांचा विशेष तुटवडा त्यांना भासला असें नाहीं. उलट मजुरांजवळ शेती असल्यामुळे ते जास्त जबाबदार बनले आहेत.

## याने संबंध सुधारतील

*याने मजूर मालक संबंध सुधारतील काय ? ही अशक्य* कल्पना नाही काय ? इंग्रजांनी राज्य सोडलें. इंग्रजांशी आपले संबंध सुधारले. आज मजूर भूदान मागत नाही. त्यांच्यातर्फे विनोबाजी मागत आहेत. न मागता जर कोणी वस्तु दिली तर देणाऱ्याबद्दल प्रेमभाव निर्माण होईल. तीच गोष्ट उद्या सत्याग्रहाने झाली, संपाने झाली वा कायद्याने झाली तर जमीन तर जाईल, प्रेम मात्र मिळणार नाही. म्हणून विनोबाजी जमीन–वांटणी बरोबरच प्रेमहि निर्माण करूं इच्छितात. आपण जसें व जितकें दान देऊं त्या प्रमाणां-

तच प्रेम निर्माण होईल. मंगरोठ मधील एक सोडून सर्वांनी सर्व जमीन दिली. मंगरोठमध्यें 'कालच्या श्रीमंत ला जास्त जमीन वांटा' असे मजूर म्हणाले. अशानें आम्हांस कमी जमीन मिळाली तरी हरकत नाही. पण यांना जास्त राहूं द्या असेंहि गरीबांनी स्वयंस्फूर्तीने म्हटलें. आपण जर रद्दी जमीन दिली, फारच कमी दिली, तुकडे तुकडे दिले तर मजूरांत प्रेम कसें निर्माण होणार? एक एक वाराचा तुकडा ४ वेळ दिला, तर कापड तर माझ्या घरांतून चार वार गेले, पण दुसऱ्यास धोतर म्हणून हे चार तुकडे वापरतां येणार नाहीत. म्हणून प्रत्येकानें स्वतः समोर आरसा धरून याचें उत्तर स्वतःच द्यावें. शेवटच्या अवस्थेंत तर मजूर मालक संबंधच ठेवावयाचे नाहींत. सर्वच मालक हे मजूर बनतील व मजूर हे मालक बनतील.

## ( ऐ ) शिक्षणाचा प्रश्न

आमच्या मुलाबाळांच्या शिक्षणाचें कसें होईल। हा प्रश्न जमीनदार विचारतात. सर्वच राष्ट्रास सुशिक्षण द्यावयाचें आहे. आज इस्टेटीच्या भरंवशावर शिक्षण चालतें. त्यामुळे गुराख्यांची मुलें, मजुरांची मुलें शिक्षण घेऊं शकत नाहींत सर्वांस शिक्षण द्यायचें असेल तर आज श्रीमंतांना थोडें खालीं

वाकावेंच लागेल. बुद्धिमान मुलास स्कॉलरशिप मिळेल. शेवटीं सर्वांच्याच शिक्षणाची सोय करावयाची आहे.

## कांही जातींचें पुढारीपण

आजच्या शिक्षित जाती आपलें पुढारीपण कायम ठेवतील व आमची मुलें बखरामागें जातील असेंहि कांहीं लोक म्हणतात. आजच्या वर्गाचें समाजांतील स्थान गुणांच्या आधारावर कायम टिकावें हाच भूदानयज्ञाचा उद्देश आहे. गुण नसतील तर स्थान जाईल. आता संपत्तिदान यज्ञहि सुरु झाला आहे. म्हणून कोणत्याहि जातीचे पीढीजात पुढारीपण आतां टिकणार नाहीं. म्हणून ज्यांना असें पुढारीपण नष्ट करावयाचें असेल त्यांनी स्वतः दान देऊन या यज्ञाचा सपाटून प्रचार करावयास पाहिजे. आजची व्यवस्था कायम राहिल्यास मात्र त्या वर्गाचें पुढारीपण कायमचें टिकणार आहे. भूदानयज्ञ हा आजच्या अर्थव्यवस्थेच्या मुळावरच प्रहार आहे.

## (ओ) केवळ मागण्यानेच काम पूर्ण होईल काय ?

समजावण्याच्या पद्धतीने दान न मिळालें तर विनोबाजी काय करतील ? समजावण्याच्या पद्धतीने कां काम होणार नाहीं ? काल जे काम तलवारीने, कायद्याने वा

कायदेभंगाने झालें तेंच आज नुसत्या समजावण्याने व्हावयास पाहिजे. पण समजा याने काम झालें नाहींच तर पुढचें पाऊल उचलावयाचें नाही अशी काही विनोबाजींनी शपथ घेतली नाही. उलट 'हे काम पूर्ण झाल्याशिवाय मी विश्रांती घेणार नाही,' अशी प्रतिज्ञा मात्र त्यांनी घेतलेली आहे. रोगी मुलाची शुश्रुषा करण्याच्या वेळेलाच मुलगा दगावला तर असा विचार करून आई लांकडें आणून ठेवीत नाहीं. तसेंच जोपर्यंत सर्व ठिकाणीं आपण जाऊन पोहोंचलों नाहीं तोपर्यंत अन्य विचार मनांत कां येऊं द्यावा ? अेका वेळेला अेक पाऊल पुरें.

## ( औ ) क्रांति कशास म्हणाल ?

कांही क्रांतिकारी म्हणतात--या यज्ञाने खरी क्रांति नष्ट होईल. जणूं रक्तपाताशिवाय खरी क्रांति होऊंच शकत नाहीं. उलट रक्तपाताने उलथापालथ होते. उलथा पालथ म्हणजे क्रांति नव्हे. क्रांति म्हणजे समाजांत रूढ असलेल्या मान्यतेत आमूल व लौकर झालेला बदल. हा बदल विचार प्रचारानेच होतो, तलवारीने नाहीं. विनोबाजी योग्य मार्गाने क्रांति करूं इच्छितात म्हणून जे आजची स्थिति कायम ठेवूं इच्छितात त्याकरितां ही क्रांति भयंकर आहे. म्हणून ज्यांना ज्यांना अराजकता नको असेल, शांति पाहिजे असेल त्यांनी

या क्रांतींत सामिल व्हावें. विनोबाजीस शांति पाहिजे, पण आजची श्मशानशांति नको. तसेंच विनोबाजीस क्रांति पाहिजे, दंडशाही किंवा अराजकता नको.

## (अं) नशीबाचें हत्यार दुधारी आहे

कांही लोक म्हणतात कीं श्रीमंतांनी मागच्या जन्मीं पुण्य केलें, म्हणून ते श्रीमंत आहेत. गरीबांनी मागच्या जन्मीं पाप केलें 'म्हणून ते गरीब आहेत. जर हें म्हणणें खरें मानलें तर या जन्माचा संबंध पुढील जन्माशीं येतो. मग श्रीमंतांनी पैसा कमवण्यांत या जन्मीं पाप केलें तर पुढच्या जन्मीं त्यांस सुख लाभेल कीं दुःख? खरोखर श्रीमंतांची नशीबावर श्रद्धा आहे काय? पैसा कमावतांना तर कोणीहि पाप पुण्याची गोष्ट 'मनांत आणत नाहीत. मग देण्याच्या वेळेसच ही गोष्ट कां? दैववाद खरा मानला तर आमचें भाग्य पालटलें, आता श्रीमंतास लुटावयास पाहिजे असेहि गरीब म्हणूं शकतील. म्हणून नशीबाचें तत्वज्ञान दुधारी तलवारीप्रमाणे आहे. गरीबांना त्याच्या भाग्यावर सोडणें भयानक आहे. त्याची दीर्घकाळ हेळसांड झाली आहे. आतां लक्ष्मीनारायणाऐवजीं दारिद्रनारायणाची उपासना केली पाहिजे.

## (अ:) वांटपाचें श्रेय कोणास

ही जमीन गांवोगांव वाटण्याची अद्‌भूत पध्दति विनोबाजींनी निश्चित केली आहे. ज्या गांवची जमीन शक्यतोंवर त्याच गांवांत वाटली जाते. वांटणीपूर्वी १ आठवडा दवंडी देण्यांत येते. ठरलेल्या दिवसाआधीं १ दिवस पुन्हा दवंडी देण्यांत येते. नंतर ठरलेल्या दिवशीं समारंभाने जमीन वांटण्यांत येते. जे जमिनीवर मेहनत करतात पण ज्यांच्याजवळ स्वतःची जमीन नाहीं व दुसरा धंदा नाहीं असे लोक आपलीं नावें नोंदवितात. सर्व गांवकऱ्यांच्या मदतीने त्यांची प्राथमिक चांचणी होते. नंतर कोणास जमीन द्यावी हें भूमिहीन ठरवितात. पुष्कळ ठिकाणीं भूमिहीनांनी अन्य बांधवांस जमीन मिळावी म्हणून आपली नांवें मागे घेतलीं आहेत. ज्याच्याजवळ काही नाहीं त्यासहि या यज्ञाने त्यागाची प्रेरणा मिळत आहे. हें दृष्य पाहून नेत्रांचें पारणें फिटतें. ज्यावेळीं भूमिहीनात एकमत होत नाहीं त्यावेळीं चिठ्ठया टाकून एकमताने निर्णय घेतला जातो. सर्व कार्यक्रम सार्वजनिक असतो. गांवांतील लोकच या पध्दतीने जमीन वाटतात. भूदानसमितीचे लोक नियम लोकांस समजाऊन सांगतात. जमीन-वांटपाचा अधिकार त्यांना नाहीं. ही तर शून्यसमिति आहे. अधिकार गांवांतील भूमिहीनां-

कडे. अशाप्रकारें पक्षपातास वाव नमलेली निर्दोष पद्धति विनोबाजींनी शोधून काढली आहे. जसें जमीनीचें तसेंच श्रमाचें. ज्या गांवचें श्रमदान त्याच गांवांत उपयोगांत आणावयाचे आहेत.

## (फ) गरीबांजवळून दान कां

राहितां राहिला शेवटचा प्रश्न. गरीबांजवळून दान घेऊन गरीबांना अधिक गरीब कां करतां ? प्रश्न योग्य आहे. याची चार कारणें विनोबाजींनी सांगितली आहेत. ज्याप्रमाणे वंदेमातरम् किंवा २६ जानेवारीची स्वातंत्र्याची प्रतिज्ञा कित्येक कार्यकर्त्यांस तोंडपाठ होती, तद्वत हीं चार कारणें सर्वांना पाठ असलीं पाहिजेत.

## (१) सर्वांत धर्म भावना यावी.

(१) समाजांत आज सर्वांत दुःखी भूमिहीन मजूर आहेत. त्या मानानें पांच दहा एकरवालाहि थोडा सुखी आहे. म्हणून सर्वांत खालच्याकरितां प्रत्येकानें थोडा थोडा त्याग केला पाहिजे. आपल्याजवळ जेवण पुरेसें नसलें तरीहि कोणी उपाशी आला तर त्यास आपण देतोंच कीं नाहीं ? हाच धर्म आहे. म्हणून गरीबानें आपल्याहून अधिक गरीबासाठीं दान द्यावें

## (२) सर्वांची आसक्ति सुटावी

(२) शेवटीं जमीनीवरील सर्वांची आसक्ति नष्ट करा-वयाची आहे. जमीनीवर कोणाचीच मालकी नको. जसा आज श्रीमंत शेंकडों एकरांचा आहे तसाच गरीबही दोनचार एकरांचा मालक आहे. या लहान मालकीवरच मोठी मालकी आधारलेली आहे. भांडवलशाहीचा हाच पाया आहे.

हाडकुळ्या गांधींनी चिमूटभर मीठ बेकायदा बनविलें. सर्व पंडित व थोर देशभक्त गांधींस हंसत होते याने समुद्र आटला नाहीं. पण बलाढ्य ब्रिटीश साम्राज्याचा पाया याने पार ढासळला. तद्वतच गरीबाच्या गुंठे-डेसिमल-दानाने शेती फारशी मिळणार नाही. पण भांडवलशाहीची शोष-णावर आधारलेली शेती समाप्त होईल. गरीबांच्या दानाने मुळावरच कुऱ्हाड पडते. म्हणून गरीबाचें दान हवें आहे.

## ( ३ ) नैतिक शक्ति निर्माण

( ३ ) श्रीमंतांजवळ जमीन मागायला, कांहीं शक्ति लागते. दंडुक्याची शक्ति व्यर्थ समजून आम्ही सोडून दिली. मग नैतिक शक्ति आम्हांस निर्माण केली पाहिजे. हजारों

गरीबांच्या दानांतून ही नैतिक शक्ति निर्माण होईल. कोणत्याहि गांवांत गरीबच जास्त आहेत. श्रीमंत मूठभर असतात. सर्व गरीबांनी दान दिलें तर श्रीमंत दान न देण्याचें दुःसाहस करूं शकणार नाहीत. असें गांवोगांवीं घडलेंहि आहे. श्रीमंताच्या दानाचा गरीबावर प्रभाव पडत नाही. पण गरीबांच्या दानाचा श्रीमंतावर हटकून प्रभाव पडेल हें अनुभवसिद्ध रामबाण औषध आहे. कारण गांवांत गरीबांच्या दानानें त्यागाची हवा तयार होईल व मग श्रीमंत लाजेकाजेस्तव कांहोईना, पण देतील.

## ( ४ ) ही सैन्यभरती आहे.

शेवटीं समजावण्यानें काम नच झालें तर श्रीमंताचीं बंद हृदयें उघडण्याकरितां मला पुढचें पाऊल उचलावें लागेल असें विनोबाजी म्हणतात. त्याकरिता माझे शिपाई कोण बनतील ? ज्यांनी आपला लोभ कमी केला तेच ना ? ज्याच्या नाकास शेंबुड आहे तो दुसऱ्यास नाक साफ ठेवण्यास कसें सांगेल ? सैन्यभरती करतांना शिपायाची छाती, उंची आदि पाहतात. मग या दानाच्या कार्यक्रमांत सैनिकानें दान दिलें कीं नाहीं हें नको कां पहावयास ? त्यागानें ज्याची उंची वाढली आहे हाच आमच्या सैन्यांतील

सैनिक. या सेनेंत कोटयवधी गरीब सामिल झाले तर या सैन्यास बाण सोडण्याचीही जरूरी भासणार नाही. नुसत्या युद्धाचा शंख फुंकण्यानेच काम होवून जावें. म्हणून पुढची लढाई लौकरांत लौकर सफल करण्याकरितां 'गरीबांचे दान' हा माझा रिक्रुट भरतीचा कार्यक्रम आहे. म्हणून गावांत जितके गरीब आहेत तितकी दानपत्रें मला पाहिजेत.

## गरीबांनी भाग न घ्यावा तर कुणी घ्यावा ?

गरीबांच्या कल्याणाकरितां जी लढाई आहे तीत गरीब भरती होणार नाहींत तर कोण भरती होतील ? गांधीजींनी इंग्रजी राज्याविरुद्ध युद्ध पुकारलें. हिंदी लोक तर पहिलेच गुलाम होते. पण तेच मुख्यतः गांधीजींच्या सत्याग्रहांत भरती झाले कीं नाही ? अँड्यूज सारखे मूठभर इंग्रजहि आले. तसेच आजही श्रीमंत येत आहेत. येतील, पण या लढाईचा मुख्य भार गरीबांनीच उचलावयाचा आहे. रशियांत लेनिनच्या लढाईंत गरीब लोक भरती झाले कीं श्रीमंत ? चीनमध्यें गरीबांनीच त्याग केला. शहरांत मजूर संप करतात त्यावेळीं मजूर त्याग करतात कीं नाही ? शेवटीं गरीबाकडून सुदाम्याच्या पोह्याप्रमाणे थोडयाशाच दानाची अपेक्षा आहे. ज्याच्याकरिता लढाई त्याच्या त्यागावरच सारी दारमदार

असते. म्हणून गरीबांनीहि आपल्याकरिता लढाई चाललेल्या या धर्मयुद्धांत विशेष रुपाने सामील व्हावें.

# १४ अंतिम चित्र

भूदान यज्ञाचें शेवटचें चित्र पूर्ण रेखाटलेलेंच आहे. समाजांतील शोषण व शासन संपुष्टांत आणावयाचें आहे. 'रामराज्य' निर्माण करावयाचें आहे. 'हराम राज्य' नष्ट करावयाचें आहे. त्यासाठी ग्रामराज्याची घोषणा आहे. मोठे कारखाने समाजाच्या मालकीचे राहतील. जमीन साऱ्या गांवची राहील. देशाची व्यापक कल्पना लोकांस करताहि येत नाही. गांव ही त्याच्या आटोक्यांतील कल्पना आहे. जमीन देशाची केल्यास ऑफिसरशाही येईल. म्हणून जमीन गावची करूंया. आजच्या गळेकापू चढाओढी ऐवजीं गोड सहकार निर्माण होईल. चढाओढ राहील. पण सहकाराच्या मर्यादेंत चढाओढ मारक न ठरता तारक ठरेल. आज नफा, भाडें, व्याज व मजूरी या चार मार्गांनें आपण पैसा कमावतों. त्यापैकीं नफा, भाडें व व्याज हीं ऐतखाऊपणाचीं पैसा कमावण्याची साधनें तिन्ही नष्ट होतील. बुद्धिजीवी व श्रमजीवी यांच्या वेतनांत तफावत राहणार नाही. आजच्या समाजाचें चित्रच पालटेल. सारा नूर बदलेल. श्रम करणें

प्रतिष्ठेचें लक्षण मानलें जाईल. फुकट खाणे हीन मानलें जाईल.गीतेने फुकट खाणाऱ्यास 'चोर' म्हटलें आहे. मुसलमान धर्माने व्याज खाणें हराम मानलें आहे. ख्रिश्चन धर्म म्हणतो 'एक वेळ सुईच्या छिद्रांतून उंट आरपार जाऊं शकेल, पण श्रीमंत माणसास स्वर्ग मिळणार नाही.' सर्व धर्मांनी शाप दिलेली ही आजची समाजरचना आपण बदलूंया. न्याया-वर, धर्मावर व प्रेमावर आधारलेली समाजरचना आपण आणूंया.

## १५ जगाच्या दृष्टीनें महत्त्व

आपण जर शांतीने आपला हा प्रश्न सोडविला.तर जगाचें नेतृत्व आपणांकडे चालत येणार आहे. स्वराज्य आपण अहिंसेने मिळविलें. हा प्रश्नहि जर प्रेमाने सोडविला तर जगास आपण रस्ता दाखवूं शकूं. आजच दुसऱ्या देशातील लोक नेहरूजींच्या परराष्ट्रीय धोरणाने व विनोबाजींच्या भूदानयज्ञानें आपणांकडे आकर्षित झाले आहेत. आज जग हिंसेस कंटाळलें आहे. चीनने व रशियाने ज्या मार्गाने आपला प्रश्न सोडविला त्या मार्गाने हा प्रश्न सोडविणें आपणास शोभत नाही. दोन लहान मुलें आपसात भांडूं शकतात. म्हाताऱ्यास झगडा करणें शोभत नाही. रशियादि

राष्ट्रें आजकालचीं पोरें आहेत. आपलें राष्ट्र प्रौढ आहे. म्हणून आपण जगाहून निराळ्या मार्गानें हा प्रश्न सोडवावयास पाहिजे. भूदानयज्ञ सफल झाल्यास हिंसेला कंटाळलेल्या जगाचें नेतृत्व आपणांकडे सहजच येईल. इतकें महान या प्रश्नाचें आंतरराष्ट्रीय दृष्टीने महत्व आहे.

सामूहिक अहिंसा हा विसाव्या शतकाचा सर्वांत मोठा शोध आहे. भूदान यज्ञ हें अहिंसा वेलीचें परिपक्व फळ आहे. अमेरिकेने जगास ॲटम बॉंब दिला. त्याने जगाचा नाश जवळ येत आहे. भारताने जगास अहिंसेचा आत्म बॉंम दिला. ही आत्म्याची शक्ति आहे. ही भौतिक शक्तींहून अनंतपट मोठी आहे. विसाव्या शतकाचा पूर्वार्ध सामाजिक अहिंसेचा मंत्रद्रष्टा गांधीच्या नांवानें ओळखला जाईल. या शतकाचा उत्तरार्ध भूदान-यज्ञाची रीत दाखविणाऱ्या गांधींच्या सुयोग्य शिष्य विनोबाच्या नांवाने इतिहास ओळखेल. जग आज रशियाच्या व अमेरिकेच्या मार्गास कंटाळलें आहे. तें आज हिंसेस व दंडशक्तीसहि कंटाळलें आहे. भारतांत तर कायद्याची प्रतिष्ठा कमी झाली आहे. अशावेळेस भूदानयज्ञाचा मार्ग लोकशक्तीचा तिसरा मार्ग—आयताच देवाने दाखवला

आहे. शेवटीं याच मार्गाचा विजय होणार हें ठरलेलें आहे.

## १६. अमृतानुभव

पण अशी जमीन कोणी दिली आहे ? भूदान यज्ञांत गरीबांनी विनोबांवर दानाचा इतका वर्षाव केला आहे कि श्रद्धा नसलेल्याच्या मनांत श्रद्धा निर्माण व्हावी, नास्तिकही आस्तिक बनावा. विंध्यप्रदेशांत चौदरपुर येथें आंधळ्या रामचरणने रात्रीं १२ वाजतां येऊन सर्वस्व दान दिलें. सकाळीं विनोबाजींनी म्हटलें, 'अरे, तो गहस्थ आंधळा नव्हता. आंधळे आपण होतों. रामाचे चरणच जणूं दर्शन देण्याकरितां आले होते'. बिहारमध्यें जयप्रकाशजींवर सर्वस्व दानाचा लोकांनी भडिमार केला. रवाईं येथील एका बेलदाराने ३० वर्षे मेहनतीने कमाविलेली आपली संपूर्ण जमीन देऊन टाकली. वंजीरगंजमध्यें पांडेजी नांवाच्या गहस्थाने ५ बीघे जमीन दिली. हें सर्वस्वदान पाहून एका विरुद्ध पक्षाच्या म्हाताऱ्यांस प्रेरणा झाली. 'पांडेजी आमच्या गांवाच्या भूमिहीन राहणार नाहींत', असें म्हणत त्याने आपली ५ एकर जमीन पांडेजींना बहाल केली. यज्ञाने राजनैतिक पक्षविरोध कसा क्षीण होत आहे याचें हें उत्कृष्ट उदाहरण आहे.

टिकारी-अमावांच्या राजकुमाराने जयप्रकाशजींना ३० बीघे सोडून बाकी सर्व-हजारों-एकर जमीन दान केली. रंकाच्या राजाने १ लाख १० हजारांपैकीं १ लाख २॥ हजार एकर जमीन —विनोबाजींनी जेवढी मागितली तेवढी— तत्क्षणीं दान केली. उरलेली जमीनहि मी १९५७ पर्यंत देऊन टाकीन हें वचन दिलें. जुन्या दानाने संपत्ति वाढो असा आशीर्वाद ब्राह्मण देत असत. हा ब्राह्मण तुझी लक्ष्मी समाप्त होवो हा आशीर्वाद देत दान मागत आहे. 'मी तुम्हाला प्रेमाने लुटण्यास आलों आहे', असें हा दिवसाढवळ्या सांगतो. तरीहि लोक त्याला लुटूं देण्यांत आपलें भाग्य समजतात. देवळीत एका गृहस्थाजवळ एका कार्यकर्त्याने ३० एकरांपैकीं ५ एकर जमीन मागितली. त्याने ५ एकर देतं नाहीं म्हणत म्हणत २३। एकरांचें दानपत्र स्वखुशीने भरलें व सर्वांस आश्चर्यचकित केलें. शंकरराव देव नागपुरांत गेले असतांना देवराव नांवाच्या शिष्याने आपली सारी जमीन दिली व वर दक्षिणा म्हणून मागितलेलें नसतांहि शहरांतील आपलें घर दान दिलें. मंगरोठला विनोबाजी गेले नाहीत. तरी तेथील लोकांनी आपली सर्व जमीन भूदानांत अर्पण केली. आतां तेथें सामुहिक शेतीचा व सहजीवनाचा प्रयोग चालू आहे अशी

आहे. शेवटीं याच मार्गाचा विजय होणार हें ठरलेलें आहे.

## १६. अमृतानुभव

पण अशी जमीन कोणी दिली आहे ? भूदान यज्ञांत गरीबांनी विनोबांवर दानाचा इतका वर्षाव केला आहे कि श्रद्धा नसलेल्याच्या मनांत श्रद्धा निर्माण व्हावी, नास्तिकहीं आस्तिक बनावा. विंध्यप्रदेशांत चौदरपुर येथें आंधळ्या रामचरणने रात्रीं १२ वाजतां येऊन सर्वस्व दान दिलें. सकाळीं विनोबाजींनी म्हटलें, 'अरे, तो गृहस्थ आंधळा नव्हता. आंधळे आपण होतों. रामाचे चरणच जणूं दर्शन देण्याकरितां आले होते'. बिहारमध्यें जयप्रकाशजींवर सर्वस्व दानाचा लोकांनी भडिमार केला. रवाई येथील एका बेलदाराने ३० वर्षें मेहनतीने कमाविलेली आपली संपूर्ण जमीन देऊन टाकली. वजीरगंजमध्यें पांडेजी नांवाच्या गृहस्थाने ५ बीघे जमीन दिली. हें सर्वस्वदान पाहून एका विरुद्ध पक्षाच्या म्हाताऱ्यांस प्रेरणा झाली. 'पांडेजी आमच्या गांवाच्या भूमिहीन राहणार नाहींत', असें म्हणत त्याने आपली ५ एकर जमीन पांडेजींना बहाल केली. यज्ञाने राजनैतिक पक्षविरोध कसा क्षीण होत आहे याचें हें उत्कृष्ट उदाहरण आहे.

टिकारी-अमावांच्या राजकुमाराने जयप्रकाशजींना ३० बीघे सोडून बाकी सर्व-हजारों-एकर जमीन दान केली. रंकाच्या राजाने १ लाख १० हजारांपैकी १ लाख २॥ हजार एकर जमीन —विनोबाजींनी जेवढी मागितली तेवढी—तत्क्षणी दान केली. उरलेली जमीनहि मी १९५७ पर्यंत देऊन टाकीन हें वचन दिलें. जुन्या दानाने 'संपत्ति वाढो असा आशीर्वाद ब्राह्मण देत असत. हा ब्राह्मण तुझी लक्ष्मी समाप्त होवो हा आशीर्वाद देत दान मागत आहे. 'मी तुम्हाला प्रेमाने लुटण्यास आलों आहे', असें हा दिवसाढवळ्या सांगतो. तरीहि लोक त्याला लुटूं देण्यांत आपलें भाग्य समजतात. देवळींत एका गृहस्था-जवळ एका कार्यकर्त्याने ३० एकरांपैकीं ५ एकर जमीन मागितली. त्याने ५ एकर देत नाहीं म्हणत म्हणत २३। एकराचें दानपत्र स्वखुशीने भरलें व सर्वांस आश्चर्यचकित केलें. शंकरराव देव नागपुरांत गेले असतांना देवराव नांवाच्या शिप्याने आपली सारी जमीन दिली व घर दक्षिणा म्हणून मागितलेलें नसतांहि शहरांतील आपलें घर दान दिलें. मंगरोठ्ला विनोबाजी गेले नाहीत. तरी तेथील लोकांनी आपली सर्व जमीन भूदानांत अर्पण केली. आतां तेथें सामुदिक शेतीचा व सहजीवनाचा प्रयोग चालू आहे

एक ना दोन, साठहून अधिक गांवें विनोबाजींना मिळालीं आहेत. ३ लाखहून अधिक व्यक्तींनी ३६ लाख एकराहून अधिक जमीन विनोबाजीस दिली आहे. त्यापैकीं हजारों एकर जमीन वाटली गेली आहे. चंद्रवदन लष्करी नांवाच्या लक्षाधीशाने संपत्तिदानांत आपली मिल देण्याचा इरादाने पहिला हप्ता म्हणून संपत्तीचा सहावा हिस्सा दिला. जय-प्रकाशजींना मुंबईच्या कोट्याधिशांनी संपत्तिदानांत भाग घेण्याचें आश्वासन दिलें आहे. मध्यभारत, राजस्थान, पंजाब येथील मंत्र्यांनी संपत्तिदानांत भाग घेतला आहे. संपत्तिदान यज्ञाला सुद्धा आतां देशभर जोराची चालना मिळाली आहे.

सत्तेशिवाय किंवा आमिषाशिवाय श्रीमंती नष्ट करण्या-करितां इतकें दान कधींहि कोणास मिळालें नसेल. असा यज्ञ पुराणांत नाहीं, कुराणांत नाहीं. रामायणांत याचें वर्णन नाहीं, महाभारतांत अशा आख्यायिका नाहींत. दहा तोंडाच्या रावणाची कल्पना करणाऱ्या व्यास-वाल्मीकींना देखील दान यज्ञाने श्रीमंती मिटविण्याची कल्पना सुचली नाहीं. असा हा अद्भूत यज्ञ या घोर कलियुगांत ईश्वराच्या कृपेने या देशांत एका संताने सुरु केला. यांत जेवढा कालमहिमा आहे, तितकीच एका संताची तपश्चर्या आहे व त्याच्या गुरूची पुण्याई आहे.

# १७. सर्वांस निमंत्रण

म्हणून-या यज्ञांत सर्वांनी भाग घ्यावा. भूदानयज्ञ हा युगधर्म आहे; ही काळाची मागणी आहे. शेकडों वर्षांच्या गुलामीमुळे जीवनाच्या विभागांत आपली प्रगति खुंटली आहे. ती प्रगति पांच-पंचवीस वर्षांत करून भारत इतर राष्ट्रांबरोबर आणावयाचा आहे. म्हणून राष्ट्रास पायारूप असलेलें हें समतेचें काम आपण चार दोन वर्षांत, लवकर आटोपूंया. त्याने पुढील सर्व प्रयत्नांना उत्साहाची भरती येईल. म्हणून ज्यास डोळे असतील त्याने हा अद्भुत यज्ञ पहावा. कान असतील त्याने याच्या महान् कथा ऐकाव्या. सर्वांनी या यज्ञाचें मर्म समजून यांत भाग घ्यावा.

## हेंच एकमेव काम करूंया

इतर सर्व कामांबरोबर हें काम होणार नाही. हा नैमित्तिक धर्म आहे. नैमित्तिक धर्म प्राप्त झाला असतां नित्य धर्म सोडावा लागतो. छोट्यामोठ्या सुधारणा व लहानसहान विधायक कामें आतां क्षणभर मागे पडूं द्या. या महान् कार्यास सर्वांनी सर्व शक्ति लावावी. मग बाकीचीं कामें शतपट गतीने होतील. अन्यथा एखादें

लहानहि काम राष्ट्रांत प्रेरणाशक्ति—दृढ इच्छाशक्ति—नसल्यामुळे पूर्ण होणार नाही. 'भगवंताने सर्व धर्म सोडून माझी एकनिष्ठ भक्ति कर', असें अर्जुनास सांगितलें आहे. त्याप्रमाणे सर्व कामें सोडून हें क्रांतिकार्य करावयाचें आहे.

## नवीन पीढीवर मुख्य भिस्त

याची मुख्य भिस्त नवीन पीढीवर आहे. जुन्या पीढीने आपणांस गुलामींतून मुक्त केलें. आतां नवीन पीढीने विषमतेंतून समता व सर्वांकरितां समृद्धि निर्माण करावयाची आहे. ज्याचें रक्त सळसळत असेल त्याने समतेच्या या लढाईंत भाग घ्यावा. कांही मानसें अशीं असतात कीं केवळ इशाऱ्याने ते अर्थ समजूं शकतात. कांहींना स्पष्टपणें सांगावें लागतें व कांहींना सांगूनहि समजत नाही. विनोबाजींनी तर स्पष्टच सर्वांना बोलाविलें आहे. जयप्रकाशजींनी जीवनदान देण्याचें सर्वांस निमंत्रण दिलें आहे.

## सर्वांनी एका वेळेस शक्ति लावावी.

हें सर्वांचें काम आहे. सर्वांनी सर्व शक्ति लावावी. एक मोठा दगड उचलावयाचा असेल तर सर्वांनी एका वेळेस शक्ति लावली पाहिजे. आज एकाने व उद्या दुसऱ्याने शक्ति लावली तर दगड उचलणें अशक्य. तद्वत सर्वांनी

हा यज्ञ सफल करण्यास आतांच ताकत लावावी. आम्ही सर्व भारतमातेचीं लेकरें आहोंत. आईवर सर्वांचा हक्क आहे. म्हणूनच हा यज्ञ आहे. यांत जो हिस्सा घेणार नाही आहुति देणार नाही तो 'अभागा' ठरेल.

## हा यज्ञ सफल न झाला तर

हा यज्ञ आज झाला नाही तर ज्वालामुखीच्या रूपांत दुसरा यज्ञ होईल. हा असा प्रकार हैद्राबादेंत सुरुहि झाला होता. त्यांत सर्व भस्म होईल. मानवता व संस्कृति सर्वच जळून खाक होतील.

## विनोबाजींची तळमळ

म्हणून विनोबा सर्वांस परोपरीने समजावत आहेत. विनोबाजी म्हणतात, १९५७ मध्यें ही आर्थिक क्रांति पूर्ण झाल्याशिवाय राहणार नाही. विनोबाजी ह्याबद्दल जेव्हां जेव्हां विचार करतात तेव्हां तेव्हा गंभीर होऊन जातात. त्यांनी खादीग्राममध्य सांगितलें कीं लवकरच मला असें पाऊल उचलावें लागेल कीं मी तर हंसत राहील व आपणास रडावें लागेल. ह्याचा अर्थ काय ?

विनोबांच्या आंत अशी आग धगधगत जळत आहे. यांतील एखादी ठिणगीहि जर आपल्यांत प्रज्वलित झाली

तरी हिंदुस्थानची कायापालट होऊन जाईल. तसें होवो व ही क्रान्ति लौकरात लौकर सफल होवो.

## हा यज्ञ सर्वांचा आहे

याकरिताच हा यज्ञ एका संताने सुरु केला आहे. कोणत्याहि एका पक्षाचा हा नाही. हा सर्वांचाच आहे. काँग्रेस म्हणते, 'हें आमचेंच काम आहे'. प्रजा समाजवादी म्हणतात, 'आम्हाला तर हेंच हवें आहे'. जनसंघाचे लोक म्हणतात, 'हा भारतीय संस्कृतिस पोषक असा मार्ग आहे'. कम्युनिस्ट पक्ष म्हणतो, 'आमचा यावर विश्वास नाहीं, पण असें झालें तर कोण ह्याचा विरोध करील ?' म्हणून भूदान यज्ञ हा साऱ्या देशाने मान्य केलला राष्ट्रीय कार्यक्रम आहे. 'म्हणून ह्यात जो भाग घेत नाहीं तो देशद्रोही आहे' असें विनोबाजींनी म्हटलें आहे. अशा प्रकारचा हा मंगलमय यज्ञ आपण करूंया. आपल्या देशातील गरीबी व विष नष्ट करूंया. व नवीन समाजाची स्थापन करूंया. म्हणजे गांधीजींचें 'रामराज्याचें' स्वप्न साकार होईल. भारत पुन्हा आपल्या नवीन तेजाने जगभर तळपूं लागेल.